


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या महाराष्ट्र साहित्य पत्रिका ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून महाराष्ट्र साहित्य परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. हे अंक सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका

वार्षिक वर्गणी ट. ह. सह ४-८; परदेशीं ५ रु. फुटकळ अंकास १ रु.

महाराष्ट्र-साहित्य-परिषदेमार्फत प्रसिद्ध होणारी

# महाराष्ट्र-साहित्य-पत्रिका.

वर्ष २ रें.] मकरसक्रांत शके १८५१ [अंक ४ था.

सह वीर्यं करवावहै । तेजस्वि नावधीतमस्तु ॥

## अनुक्रमणिका



जानेवारी १९३०

## परिषदेची हानि

एकामागून एक मृत्युलेख लिहिण्याचा प्रसंग येणें ही अत्यंत दुर्दैवाची गोष्ट होय. साहित्यपत्रिकेविषयीं आस्था बाळगून तिला लेखनसाहाय्य करणारे प्रो. चिंतामण गंगाधर भानू हे मार्गशीर्ष व. ३० सोमवार या दिवशीं रात्रीं बाराच्या सुमारास कालवश झाले हें कळविण्यास आम्हांस फार वाईट वाटतें. ह्या इतिहासप्रेमी नाना फडणविसांच्या वंशजाचा जन्म बंडाच्या सालाच्या अगोदर एकच वर्ष झाला असल्यामुळें मरणसमयीं त्यांचें वय ७३ वर्षांचें होतें. हे बी. ए. होते हें सर्वांस माहीत आहे. पण ओव्हरसिअरची परीक्षा पास होऊन तें कामहि त्यांनीं कांहीं काल केलें होतें ही गोष्ट पुष्कळांस अज्ञात असेल. तत्वज्ञान, इतिहास, नाटकें कादंबऱ्या इत्यादि अनेक विषयांत ते मार्मिकपणानें लिहूं शकत. पत्रिकेंतील "ज्ञानतंतुव्यूह" ही लेखमाला पुरी होण्यापूर्वींच प्रो. भानूंचा अंत झाला. या अंकांतील लेखाचीं मुद्रितेंहि त्यांस तपासतां आलीं नाहींत. हे बुद्धिमान असून तडफदार होते. बुद्धीचें तेज त्यांच्या मुद्रेवर चमकत होते. प्रो. भानु अत्यंत सुशील व सुस्वभावी होते. त्यांच्या निधनानें परिषदेचें फार मोठें नुकसान झालें आहे.

---

## कार्यकारी मंडळाच्या सभा

(२०-१०-२९)

हजर—१ बा. गो. चापेकर. २ ज. र. घारपुरे. ३ पां. वा. काणे.
४ सुं. भा. वैद्य. ५ के. ल. ओगले. ६ न. र. फाटक.

१ विषय—भोजराज प्राइझ.

ठराव=(१) संमेलनामध्यें संमेलनाच्या अध्यक्षांच्या हस्तें भोजराज प्राइझ देण्याची तजवीज परिषदेकडून होईल.

(२) सदरहु प्राइझचा व पदकाचा संबंध नसल्यामुळें पदक देणें न देणें याचा विचार स्वतंत्रपणें परिषदेला करावा लागेल. पण सध्यांच त्या गोष्टीचा निकाल करणें परिषदेस शक्य नाहीं.
वरीलप्रमाणें ज्ञान-प्रकाशक-मंडळास कळवावें.

२ विषय—ग्रंथप्रकाशनासंबंधीं

ठराव=(१) रा. जांभेकर यांजकडून चारशें रुपये आगाऊ घेऊन त्यांना ३००० प्रति काढण्याची परवानगी द्यावी.

(२) इतर बाबींसंबंधानें योग्य तो करार मागील बैठकींत ठरल्याप्रमाणें करून घ्यावा

(३) लोकशिक्षण मासिकांतून प्रथम प्रसिद्ध करण्यास परिषदेची हरकत नाहीं.

३ विषय—वर्गणीची तकरार

ठराव=कित्येक सभासदांचें असें म्हणणें आहे कीं, आम्ही स. १९२८

# गुजराथ-एक सांस्कारिक व्यक्ति

( भाषांतरकार--वि. स. वाकसकर, वडोदें. )

महाराष्ट्र साहित्य परिषदेप्रमाणेंच गुर्जर साहित्य संसद ( सन १९२४ मध्यें ) अस्तित्वांत येऊन तिचें पहिलें अधिवेशन सन १९२५ मध्यें अॅड्व्होकेट रा. कन्हैयालाल माणकलाल मुनशी यांच्या अध्यक्षतेखालीं भरविण्यांत आलें होतें. अध्यक्ष या नात्यानें त्यांनीं केलेलें भाषण गुजराथी भाषेच्या दृष्टीनें तर अपूर्वच आहे, पण त्या भाषणांतील गुजराथी साहित्यभक्तांचा आढावा ऐतिहासिक दृष्ट्याहि फार महत्त्वाचा आहे. म्हणून त्या भाषणाचें मराठी भाषांतर या लेखांत देण्याचें योजिलें आहे.

संसद स्थापन होऊन नुकतेंच एक वर्ष झालें न झालें तोंच मोठ्या थाटानें तिचें अधिवेशन भरविलेलें पाहून अध्यक्षांनीं आनंद प्रदर्शित करून चालकांना आरंभीं धन्यवाद दिले आहेत; आणि फलाविषयींशून्यचित्त राहून कोणताहि स्तुत्य प्रयत्न सतत करीत राहणें हेंच आपलें कर्तव्य आहे हें गीतेंतील तत्त्व चालकांनीं लक्षांत ठेवावें असा उपदेश केला आहे. याप्रमाणें सुंदर प्रस्तावना केल्यावर अध्यक्ष म्हणतातः—

आपल्या साहित्यसेवकांची स्थिति फारच निकृष्ट झालेली आहे. इंग्रजी भाषेचे अभिमानी त्यांच्याकडेस तिरस्कारानें पाहतात, मध्यम वाचकवर्ग आपल्या मेहेरबानीच्या उपकाराखालीं त्याला दडपून टाकतो, आणि साधारण वाचकवर्ग गायक व कत्थक या कलाभिज्ञांकडेस ज्या करमणुकीच्या दृष्टीनें पाहतो त्या मौजेच्या निरीक्षणानें साहित्य सेवकांकडे दृष्टिक्षेप करून स्वतःचें श्रेष्ठत्व प्रस्थापित करतो. साहित्यसेवकास श्रमाच्या मानानें द्रव्याची प्राप्ति नाहीं व यशाचीहि आशा नाहीं. त्याच्या उत्साहास वेडेपणाची लहर म्हणतात व त्याच्या उत्कट भावना अव्यावहारिक ठरवितात. परंतु इतकें असूनहि साहित्यसेवक बिचारा मोठ्या आशावादित्वानें सतारीच्या तुटलेल्या तारेप्रमाणें शक्य तेवढा मोहक सूर काढीतच असतो. त्याची दृष्टि भविष्यकालासंबंधीं मंद झालेली असते आणि आत्मविश्वास क्षीण दशेला गेलेला असतो. तथापि त्याच्या श्रद्धाळू अंतःकरणा, मध्यें आशारूप ज्योति तेवत असते व त्यास बजावीत असते कीं, "हे साहित्यसेवका-तुझा दुर्बळ ध्वनिसुद्धां एके दिवशीं नादब्रह्म होऊन त्याच्या आवाजानें जागृत झालेलें विश्व आत्मनिरीक्षण करूं लागेल." साहित्यसेवकाचें हें मीं काढिलेलें शब्दचित्र कित्येकांना दयाजनक वाटेल तर कित्येकांना हास्यजनक वाटेल. परंतु माझी स्वतःची अशी समजूत आहे कीं, आपण स्वतः इतरांप्रमाणें साहित्यसेवकांची अनुकंपा करणें अगर त्यांस हंसणें यापेक्षां वरप्रमाणें भग्न हृदयानें तुणतुणें वाजवीत बसणें यांतच आपल्या जीवाचें साफल्य आहे. स्वतःच्या देशांतील सगळा व्यवहार स्वभाषेंत होणें; स्वतःची भाषा, साहित्य आणि संस्कार यांची श्रेष्ठता जगांत स्थापन होणें; स्वतःचा व स्वतःच्या

संस्कृतीचा आत्मा शब्दरूपानें बाहेर पडणें हीं सगळीं स्वप्नें निरंतर पाहण्यांत मला जो आनंद वाटतो, तो आनंद, परदेशी भाषा, आणि परदेशी संस्कार यांच्या भाडोत्री सिंहासनावर विराजमान होण्यांत किंवा भावनाविहीन व शुष्क अशा मोठेपणाच्या शिखरावर आरूढ होऊन दृष्टिक्षेप करण्यांत वाटत नाहीं.

आपला हा उपक्रम छोटासाच आहे. आपली अपेक्षाहि फार मोठी नाहीं; आणि आपली शक्ति तर फारच अल्प आहे. तथापि गुजराथेमध्यें हल्लीं जी प्रतापी व सर्वव्यापी भावना प्रसृत झाली आहे, तिच्या योगें आपली संस्थाहि नांवारूपास लवकर येईल, अशी माझी मनोदेवता मला सांगते. गुजराथच्या महत्तेंत श्रद्धा वाढत आहे, आणि त्याच श्रद्धेच्या पायावर ही भावना उभारलेली आहे. ही भावना आपल्या जीवनास प्रेरणा करीत आहे, हीच भावना आपल्या स्त्रीपुरुषांना आदर्शवत् झाली आहे, हीच भावना आपल्या साहित्याला व संस्काराला उन्मीलित करीत आहे, हीच भावना सर्व गुजराथच्या भव्य भूतकाळापासून शोभत आहे, उत्साही वर्तमानकालीं तळपत आहे आणि तेजस्वी भविष्यकाळाची मार्गदर्शी आहे. सारांश ही संस्कारभूमि भगवान् श्रीकृष्णचंद्राच्या कौमुदीप्रमाणें उज्वल आहे.

अल्पश्रद्धेंत आनंद मानून कित्येकजण प्रांतिक अभिमानाची हेटाळणी करितात, व हा प्रांतिक अभिमान हिंदी राष्ट्रीयतेच्या आड येतो असेंहि म्हणतात. पण परदेशी धोरण या देशास लाविण्याच्या उतावळीमध्यें हे लोक आपला इतिहास, आपली देशस्थिति आणि आपल्या परिस्थितीनें अस्तित्वांत आलेल्या कित्येक रूढी यांच्याकडे दुर्लक्ष्य करितात. आज शेंकडों वर्षांपासून हिंदुस्थानांत प्रांतिक समाज, प्रांतिक साहित्य आणि प्रांतिक संस्कार अखंड चालत आले आहेत. आणि प्रत्येक प्रांतांतील संस्कृतीनें लाक्षणिक स्वरूपानें आपलें अस्तित्व प्रगट केलें आहे. आणि आर्यांच्या प्रबळ आत्म्यानें या सर्व प्रांतांतील जीवनांत आणि संस्कारांत अशा प्रकारची एकतानता ठेविली आहे कीं, या निरनिराळ्या प्रांतांवर जणूं एकराष्ट्रीयत्वाचा छापच मारून ठेविला आहे. त्यामुळें प्रांतिक अभिमान कायम असूनहि त्यायोगें एकराष्ट्रीयत्वाला बाध आलेला नाहीं. उलट असेंच म्हणतां येईल कीं, जसजसा प्रांतिक अभिमान वाढेल तसतशी आर्यावर्ताच्या एकराष्ट्रीयत्वाचीहि वृद्धिच होईल.

## २

प्रस्तुत समजूत वाटेल ती असो पण आबूच्या पाहाडापासून मुंबईपर्यंतचा सागरतटस्थ प्रदेश विलक्षण रीतीनें भौगोलिक आणि सांस्कारिक व्यक्तित्व गाजवून राहिला आहे इतकेंच नव्हे, परंतु जोंपर्यंत रेवा नदीचें पाणी वाहील, जोंपर्यंत गिरनारचें शिखर गगनांत विहार करील आणि जोंपर्यंत समुद्राच्या लाटा किनाऱ्यावर येऊन विराम पावतील तोंपर्यंत हा प्रदेश असेंच आपलें व्यक्तित्व गाजवीत राहील.

कित्येकांच्या मतानें हिंदुस्थानचे तीन भाग होतात. पहिला भाग पूर्वेस समुद्रापर्यंत असणारा गंगायमुनामधील प्रदेश; दुसरा भाग पश्चिम समुद्रापर्यंत असणारा यमुना आणि गोदावरी यांच्यामधील प्रदेश; आणि तिसरा गोदावरीच्या दक्षिणेकडील प्रदेश. या तीन प्रदेशांत आर्य संस्कृती तीन प्रकारांनीं दृष्टोत्पत्तीस येते.

यांतील दुसऱ्या विभागांत रजपुताना, मध्यप्रांत, गुजराथ वगैरेंचा समावेश होतो. हा विभाग दीर्घकालपर्यंत एकाच राज्यचक्राखालीं राहिलेला आहे. त्यांत पुष्कळ अंशानें रीतिभाति आणि भाषा सारखीच आहे. आणि पुष्कळ वेळां संस्कारांच्या एकाच लाटेनें त्यांचें सगळें जीवन व साहित्य यांवर आपली छाप पाडलेली आहे. या सगळ्या विभागांत गुजराथेचें व्यक्तित्व पृथक् व मोहक असेंच दिसत आहे. या व्यक्तित्वाची रूपरेषा स्पष्ट होण्यापूर्वीं गुजराथेचा इतिहास व त्यांतील पराक्रम, त्यांत प्रगट झालेली भावना आणि जीवनाच्या ओघाचा अभ्यास जरी आज प्राथमिक अवस्थेंत आहे तरी त्याचा अस्पष्ट कां होईना पण भास झाल्याशिवाय राहत नाहीं.

ऋग्वेदकालाच्याहि पूर्वीं कुशावर्त हा या खंडाचा विभाग होता[१]. आणि त्याच वेळीं आर्यांच्या कुशजातीनें पहिल्याप्रथम तेथें वसति करून कुशस्थलीची स्थापना केली असावी असें वाटतें[२]. कुशपुत्रांनीं नामशेष युरेथ्रियन नांवाच्या समुद्रकांठीं फिनिशियन नांवाच्या उत्साही व्यापारी प्रजेस जन्म दिला. आणि फिनिशियन लोकांनीं व्यापार, नौकानयन, लेखन इत्यादि शोधून काढून प्राचीन युरोपीय संस्कृतीची स्थापना केली[३]. हे कुशपुत्रच आर्यांची कुशजाति होय; युरेथ्रिअन तोच अरबी समुद्र; फिनिशियन—प्यूनिक— पणिक तेच ऋग्वेदांतील द्रव्यलोभी पणी आणि कुशस्थली (द्वारका) हें व्यापारी स्थळ. हे सिद्धान्त कल्पना करण्यास जेवढे सरस तेवढेच सिद्ध करण्यास कठिण होत.

त्यानंतरच्या युगांत शार्यात नांवाची आर्यजाति गुजराथेंत वास करीत होती. तिनें यास आनर्त हें नांव दिलें[४]. शर्याति आणि उशना कवि यांचा च्यवनाशीं संबंध आहे त्यावरून आणि च्यवनाचा आश्रम नर्मदातीरीं होता असें म्हणतात त्यावरून भृगुसुद्धां याच काळांत गुजराथेंत आले असें दिसतें[५]. हे भृगु अग्निपूजक, मंत्रतंत्रांचे उपासक आणि अमानुषी सत्तेचे अभिलाषी योद्धे होते. त्याच काळांत नर्मदेच्या तीरीं नागलोकांची वसति होती असें मानण्यासहि प्रबळ कारणें आहेत[६].

---

१ Das Ṛgvedic, India p. 190 note. २ मत्स्यपुराण ११-४०; १२-२२; हरिवंश; १-१०१. विष्णुपुराण ४-१. ३ Das Ṛgvedic India, p. 184 &c. Historians' History Vol. II, p. 260, Vol. I page 526. ४ मत्स्य. १२-२१ हरिवंश. ५ ऐतरेय ब्राह्मण ८-२१-४; शतपथ ४-५-१; जैमिनीय ब्राह्मण ३-१२०-१२२; महाभारत वनपर्व १२२-१२५; अनुशासन ८५,९०, हरिवंश १०-२९; विष्णुपुराण ४.१- २१; मत्स्यपुराण ४३-२९; ६ XLII Sacred Books of the East, Introduction. ऋग्वेद १-६०-११; ३-५-१०; मत्स्यपुराण ४३-२९.

गुजराथेंत साहस आणि व्यवहारकुशलता कुशजातीनें आणिली. गुजराथेंत सत्तेची महत्त्वाकांक्षा आणि व्यवस्थितपणा भृगूंनीं उत्पन्न केला.

यानंतर शौर्य आणि उत्साह यांचे निस्सीम उपासक जे हैहय ते गुजराथेंत आले. ते मध्यस्थ आर्यजातीचे नव्हते. त्यांचे संस्कार पंचजनांप्रमाणें विशुद्धहि नव्हते. त्यांच्या विजयकांक्षेला सीमा नव्हती. त्यांनीं गुजराथला अनूपदेश हें नांव दिलें. त्यांची राजधानी नर्मदा तीरावर माहिष्मती नगरींत होती. आणि त्यांची सत्ता चारहि दिशेस दूरवर पसरली होती.

हैहयवंशांतील सहस्रार्जुनाचा दरारा पंजाबपासून लंकेपर्यंत होता. त्याच्या लढाऊ जहाजांनीं समुद्राचाहि गर्व उतरला. आर्यावर्ताची सत्ता आणि संस्कार यांना त्यानें तुच्छ लेखिलें. तोच गुजराथेचा प्रथम सम्राट होय व त्याचा राज्यविस्तार पाहिला म्हणजे आर्यांचा पहिला चक्रवर्ती राजाहि तोच होता असें दिसतें. त्याच्या साम्राज्याच्या सीमेंत अनूपदेश, सौराष्ट्र वगैरेंचा अंतर्भाव झाला होता. आणि त्याचा राज्यविस्तार मथुरेपासून तापीपर्यंत आणि समुद्रापासून अमरकंटकापर्यंत होता असें वाटतें. हिंदुस्थानांतील दुसऱ्या विभागाची एकतानता याच्याच कारकीर्दींत झाली असें दिसतें.[७८] स्वतःची उन्नति करून घेण्याची गुजराथेची वृत्ति व धर्मधुरेची असहिष्णुता (non-conformity) याच जातींतून उत्पन्न झाली नसेल ना ! !

परंतु सहस्रार्जुनाच्या महत्त्वाकांक्षेमुळें सगळें आर्यावर्त संतापून गेलें. तेथील शूरवीर काव्यजातीनें पुढारीपण स्वीकारिलें. जामदग्नि राम त्यांचा नेता झाला व त्यानें सहस्रार्जुनाचा पराजय केला आणि त्याच्या साम्राज्याचा नाश केला. आर्यांच्या विजयघोषणेनें सगळा उत्तरहिंद दुमदुमून गेला. परशुरामानें माहिष्मती धुळीस मिळविली व अनूपदेश उद्ध्वस्त केला. आर्यावर्ताचे संस्कार व भावना गुजराथेंत पसरून शेंवटीं त्यानें येथेंच निरंतरची वसति केली. अनूपदेशाला शूर्पारक हें नांव तेव्हांपासूनच प्राप्त झालें. अर्जुनाची प्रतापी माहिष्मती नगरी जाऊन तेथें भृगुतीर्थ आणि जामदग्न्य तीर्थ स्थापन झालें. जमदग्नीसारख्या ऋषींचा पुत्र व विश्वामित्रासारख्या मंत्रद्रष्ट्याचा भाचा जो परशुराम त्यानें गुजराथेला आर्यसंस्कृतीचें केंद्रस्थान बनविलें इतकेंच नव्हे पण गुजराथ हेंच नवआर्यावर्त झालें.

या नवआर्यावर्तांत कुशांचें साहस व व्यवहारकुशलता होती, भृगूंचें शौर्य व व्यवस्थाशक्ति होती, हैहयांची विजयाकांक्षा व प्रागतिक धर्मबंधनांचा तिरस्कार होता; यांमध्यें शुद्ध आर्यांचे संस्कार आणि भावना यांचें मिश्रण झालें. आर्यांच्या बुद्धिप्रभावानें आणि संस्कारशालित्वानें सर्वांचें एकीकरण करून प्रबल व्यक्तित्व प्रगट केलें. आर्यदेशाच्या सीमेवर परसंस्कारांचा होम करण्यास व स्वसंस्कारांना शुद्ध करण्यास वेदी सिद्ध केली.

---

७८ Māhishmatī of Kārtavīrya, Ll Indian Antiquary p. 217.

जनतेच्या इतिहासांत आर्यसंस्कृति प्रथमबल आहे. जेथें जेथें ती गेली तेथें तेथें हवा पाणी व समय यांचा स्वतःवर पगडा न चालूं देतां तिनें विजयच मिळविला आहे. परक्यांच्या उत्तम संस्कारांचाहि तिनें स्वीकार केला आहे. इतर जातींमध्यें आर्यांच्याबद्दल आपलेपणा उत्पन्न केला. सारांश स्वतःचें शरीर जरी बदललें तरी आत्मा मात्र शुद्धच ठेविला. आर्यसंस्कृतीची सत्ता उत्तरध्रुवापासून दक्षिणध्रुवापर्यंत आजहि गाजत आहे.

असा अवर्णनीय पराक्रम करण्यासाठीं आर्यसंस्कृतीला दुसऱ्यापासून पुष्कळ घ्यावें लागलें आहे, स्वतःमधील कित्येक निरुपयोगी अंगांचें रूपांतर करावें लागलें आहे, आणि पुष्कळ वेळां प्रत्यक्ष पराजयांतून विजयाची ध्वजा बचावून नेऊन अनुकूळ प्रसंगीं तीच ध्वजा फडकविण्याची हिंमत ठेवावी लागली आहे. सेमिटिक संस्कृतीच्या केन्द्रस्थानांत, अंधकारग्रस्त यूरोपच्या जंगली प्रदेशांत, अमेरिकेच्या अरण्यांत, कानड्याच्या हिमप्रदेशांत आणि दारुण जीवनकलहांत आर्यसंस्कृतीला झगडावें लागलें आहे. परंतु जो जीवनकलह तिला या हिंद देशांत करावा लागला, जे परसंस्कार शुद्ध करण्याचे प्रयोग तिला येथें करावे लागले तसा प्रकार इतर कोणत्याहि देशांत तिला अनुभवावा लागला नाहीं. आणि हिंदपूर्वइतिहासकालाचें आर्यावर्त आजहि आर्यावर्तच आहे आणि त्याची संस्कृति शुद्ध व सर्वांगसुंदर अशीच आजहि येथें जिवंत आहे.

परसंस्कार शुद्ध करून घेणें व आर्यसंस्कार शुद्ध ठेविणें याचें हिंद हें एक प्रयोगक्षेत्र आहे असें मानिलें तर परशुरामाचें नवआर्यावर्त गुजराथ ही त्या क्षेत्राची प्रतापी भट्टी आहे. परस्परविरोधी संस्कार त्या भट्टींत येऊन पडले. त्यामुळें त्यांच्यांतील विष जळून भस्म झालें आणि आत्मा आर्यत्व पावला. अर्थात्च त्या आत्म्याच्या ठिकाणीं आर्यांची सनातन भावना नवीन स्वरूपानें उदय पावली. भूतकालांत गुजराथेचें हें स्थान होतें, वर्तमानकाळांत तेंच स्थान आहे आणि भविष्य काळांतहि तेंच स्थान कायम राहील.

कित्येक शतकें गेलीं परंतु गुजराथेचें तेंच स्थान स्थिर आहे. हैहयांचे वंशज आर्यसंस्कृतीचे नेते बनले. आनर्तांचा राजा व वसुदेवाचा पुत्र बलदेव यानें आर्यांचें शौर्य सतेज ठेविलें. भृगुवंशज मार्कंडेयानें तापीतीरावर वसति करून आर्यभावना जिवंत ठेविली.[१] आणि प्रणयी, मुत्सद्दी, वीर आणि योगी असा जो भगवान् श्रीकृष्ण त्यानें स्वतःच्याठायीं आर्यसंस्कृतीचा श्रेष्ठ आदर्श मूर्तिमंत उत्पन्न करून गुजराथेचा नव आर्यावर्त म्हणवून घेण्याचा अधिकार चालू ठेविला.

३

दारुण भारती युद्धानंतर कित्येक शतकेपर्यंत गुजराथेचें नांव इतिहासपटावर आढळत नाहीं व याला कारण काय असावें हेंहि कळत नाहीं. पूर्वी पांचव्या शतका-

१ महाभारत वन. ८८

पर्यंत शूर्पारक ( सोपारा )[१] व भडोच[२] या बंदरांचा आंतरराष्ट्रीय व्यापार मोठ्या जोरानें चालत होता. तसेंच मिसर व आसीरियापर्यंत गुजराथेच्या साहसाचा प्रभाव प्रकट झाला होता.[३] कुशस्थलानें प्रारंभ केलेल्या युगाचा प्रचार भृगुकच्छानें चालू ठेवला व पृथ्वीवरील निरनिराळे संस्कार या भट्टींत शुद्ध करण्याचे प्रयोगहि कायम राहिले.

विक्रम संवतापूर्वी सहाव्या शतकापासून यौधेय नांवाची जाती विख्यात झाली होती[४]. याच वेळेस कांहीं काळपर्यंत इतिहासावरील अंधकारपट बाजूस सारून ही शूर यौधेय जाति कित्येक शतकेंपर्यंत प्राबल्य पावती झाली होती असें वाटतें. या जातींत प्रजासत्ताक शासनतंत्र होतें.[५] हें लोकसत्तात्मक शासनतंत्र व्यापारी साहसामुळें असो कीं, व्यावहारिक बुद्धिशालित्वामुळें असो, पण तें होतें ही गोष्ट खरी आहे. व इतक्या प्राचीन काळीं ज्याअर्थी लोकशासनाचे अंकुर दिसतात त्याअर्थी येथील जीवनतत्त्व असाधारण असलें पाहिजे एवढें सिद्ध होतें. या भूमींत हे अंकुर उगवले ते काय आर्यसंस्काराचे परिपाकरूप होतें काय ? आणि पंचायत पद्धति वेदकालापासून चालत आलेली आहे; पाटलीपुत्राच्या शहर सुधराईचें लोकशासन[६], लिच्छवींचे गण[७] आणि अथेन्सच्या ग्रीक आर्यांच्या लोकसत्तात्मक संस्था आणि येथील उपर्युक्त शासनसंस्था या सर्वांचा आत्मा काय एकच होता ? इतकें मात्र निश्चितपणें सांगतां येतें कीं, गुजराथ आणि माळवा मिळून सांस्कारिक व्यक्ति एकच होती, व संस्काराचें केंद्रस्थान सोपारा व भृगुकच्छ यांच्याऐवजीं अवन्ति नगर झालें होतें.

परशुरामाच्या वेळीं ज्याप्रमाणें सगळ्या आर्यजातींत आपलेपणा उत्पन्न होऊन नर्मदेच्या उत्तरप्रदेशांत सगळीकडे आर्यसंस्कार प्रचलित झाले होते, त्याचप्रमाणें विक्रमसंवताच्यापूर्वी तिसऱ्या शतकांतसुद्धां झालें होतें. तक्षशिलेंतील एक ब्राह्मण आणि पाटलीपुत्राच्या राजवंशांतील एक राजपुत्र या दोघांकडे या नवीन युगाचें सूत्रधारित्व आलें. त्यांनीं सर्व हिंदुस्थानांत आपलेपणा व ऐक्य यांचा प्रसार केला. चक्रवर्तित्व, साम्राज्यत्व, हिंदुस्थानचें राजकीय ऐक्य इत्यादिसंबंधीं हिंदुस्थानचीं स्वप्नें सिद्ध झालीं. मौर्य चंद्रगुप्तानें आणि भगवान् चाणक्यानें आर्यसंस्कारांचें वर्तुळ हिंदपेक्षांहि विशाल केलें. गुजराथ, या वर्तुळाचा एक विभाग होऊन राहिली; परंतु यौधेयांचें बळ कमी झालेलें दिसत नाहीं.

परंतु विक्रमसंवतापूर्वी दुसऱ्या शतकांत या राष्ट्राच्या दुर्दैवानें मौर्यांचा अस्त होऊन काबूल व सिंध येथें ग्रीकांचें राज्य स्थापन झालें, त्यामुळें ग्रीक सत्ता व संस्कार यांचा संचार सर्वत्र सुरू झाला. हा संचार फार परिणामकारक झाला असें दिसतें.

---

१-२ बवेरुजातक, Mukerji's History of Indian shipping, p. 74, Book 1, Part I, Chap. III. ३ Mookerji Shipping p. 82 & 91; Kennedy on the Early Commerce betweenIndia & Babylon, 1898 J.R.A.S. ४ पाणिनी ५-३-१७ ५ Bombay Gazetoer History of Gujrat (B. G. H.) p. 37. ६ Vincent Smith Capt. V. ७ Rhys David: Budhistic Suttas.

नहपान (वि. सं. १३४) आणि झामोतिकचा मुलगा चष्टन यांच्यासारख्या क्षत्रपांनीं गुजराथ, काठेवाड आणि माळवा यांवर साम्राज्यसत्ता गाजविली असें दिसतें.

यावेळीं परसंस्कार गुजरायेंत शिरले असें वाटतें. परंतु या वेदीच्या तापाची प्रखरताहि फार तीव्र होती यांत शंका नाहीं. कारण त्या तापानें परसंस्कार वितळून गेले. परदेशी सत्रप ( Satrap ) झमोतिकाचा मुलगा चष्टन याच्या पुत्रास जयदाम हें आर्य नांव देण्यांत आलें. त्याचा तनय महाक्षत्रप रुद्रदामन् हा (वि. सं. १९९-२१४) माळवा, गुजराथ, कच्छ, सिंध व मारवाड यांवर साम्राज्य स्थापन करता झाला[८]. इतकेंच नव्हे पण यानेंच यौधेयांचा नाश केला, आर्यसंस्कृतीचें प्रतिनिधित्व पतकरलें व नवआर्यावर्ताचें नेतृत्व स्थापन केलें. कार्तवीर्य अर्जुनाच्या साम्राज्याचें पुनरुज्जीवन यानें केलें. हा राजा मूळचा आर्य नसूनहि येथील भट्टीच्या आंचेनें कट्टा आर्य बनला.[९] या राजानें स्थापन केलेली महत्ता येथें वि. सं. ४५४ पर्यंत चालू होती.[१०]

पुढें येथील आर्यसंस्कारांचें संरक्षण गुप्त साम्राज्यामुळें ( वि. सं. ४६६ पासून ५३६ ) किती झालें हें सांगणें कठिण आहे. गुप्त सत्तेचा उद्भव हा आर्यसंस्कारांच्या विजयाचा एक प्रचंड तरंगच होता. या सत्तेनें ब्राह्मण धर्माची स्थापना केली, संस्कृत भाषेला राष्ट्रभाषा बनविली, बुद्ध धर्माचा लय केला, आर्य भावना जिवंत केल्या व देशांत राजकीय व राष्ट्रीय ऐक्य स्थापन केलें. गुजराथ हा गुप्त साम्राज्याचा एक विभाग होता.[११] आणि या प्रदेशांत तेव्हांपासून संस्कृत भाषेचें प्राबल्य वृद्धिंगत झालें आहे हें पाहिलें म्हणजे या साम्राज्याच्या प्रतापानें आर्यधर्म व संस्कार दोहोंनाहि येथें प्रबल होण्यास उत्तम संधि मिळाली असें दिसतें. त्यावेळीं संस्काराचें केंद्रस्थान वडनगर होतें यांत आश्चर्य नाहीं, परंतु याला ऐतिहासिक प्रमाण नाहीं.

परंतु पुनः या भट्टीवर परसंस्काराच्या राखेचा थर बसला. शक लोक यावेळीं आलेच होते. पण त्याशिवाय इराणहून मगजातिहि येऊन थडकली.[१२] हूण, गुर्जर व मैत्रकहि येऊन पोहोंचले.[१३] त्रिकुटांचें आगमन झालें.[१४] पण असें असूनहि राखेखालीं संस्काराचा अग्नि जिवंत होता. उज्जैन, वडनगर (या शिवाय इतर शहरांचीं नांवें कांहीं प्रसिद्ध नाहींत) या शहरांत त्या अग्नीला पुनः प्रज्वलित करण्याच्या इच्छेनें बौद्धभिक्षु, जैनसाधु आणि नागर ब्राह्मण संभाळून ठेविते झाले. या वेळच्या वडनगरी ब्राह्मणांची शक्ति व आर्यत्व गुजराथेस भूषणभूत झालें आहे असें वाटतें.

या वर्गानें केलेल्या संरक्षणाच्या प्रतापानें विक्रमसंवताच्या सहा सात व आठव्या शतकांत वलभीपुरांत संस्कार व सत्ता शोभायमान दिसत होत्या. पाशुपतमतावलंबी ब्राह्मण संस्काराचे प्रतिनिधी होते.[१५] तसेंच बौद्ध भिक्षुंचेहि बरेंच प्राबल्य होतें असें

८ B. G. H. P. 36 ९ गिरनार येथील सुदर्शन तलावांतील रुद्रदामन याचा लेख. १० B. G. H. p. 53. ११ गिरनार सुदर्शन तलाव स्कंदगुप्ताचा लेख. १२-१३ Bhandarkar Foreign Element in Hindu Population I. A. vol. XL, Jany 1911; Bhandarkar; Gujrat, JBRAS XXI p. 413. १४ B. G. H. p. 57. १५ B. G. H. p. 83.

दिसतें. वल्लभीपुरचे भट्टार्क परदेशी असले तरीहि त्यांनीं संपूर्ण रीतीनें आर्यत्वाचा स्वीकार केला होता यांत संशय नाहीं.

वल्लभीपुरचें राज्य नष्ट होतांच परदेशी संस्काराचें जूं गुजराथच्या मानेवर बसलें. या भट्टीच्या दुर्जय प्रतापानें पुनः एकदां किमिया करण्यास प्रारंभ केला. सातव्या शतकांत ह्युएनसंग आला. त्यावेळीं वल्लभीपुर नामशेष होऊन केन्द्रस्थान भिन्नमाल झालें होतें.[१६] व परदेशीं गुर्जर आर्यसंस्काराचे रक्षक व विस्तारक बनले होते. या गुर्जरांनीं (वि. सं. ६३६ ते ८६४) भडोच येथें आपली सत्ता प्रस्थापित केली होती. तथापि त्यांच्या सत्तेचें खरें क्षेत्र राजपुताना होतें,[१७] व त्या सत्तेचा खरा समय सातव्या शतकापासून तों पुढें अल्बरूनी आला (वि. सं १०८६) तोंपर्यंत होता.

भिन्नमालचा परदेशी राजा स्वतःस क्षत्रिय म्हणवीत होता[१८]. त्याच्या दरबारांत माघासारखा संस्कृत कविशिरोमणि व ब्रह्मगुप्तासारखा खगोलवेत्ता विराजत होता[१९]. सूर्योपासनेचा जोर तेथेंच होता[२०] व तेथूनच विद्वत्ता व संस्कार चारहि दिशांना पसरत होते.

विक्रम संवताच्या दुसऱ्या शतकानंतर एका ऐतिहासिक गोष्टीकडे आपले विचार गुंतून राहतात. विशिष्ट संस्कृतीच्या परिणामामुळें हल्लींची गुजराथ (किंवा कार्तवीर्याचे अनूप अथवा रुद्रदामनूचें आवर्त) नवीन व्यक्तित्व पावली असें दिसतें. उज्जैन अथवा सिंधचे सत्ताधीश तिच्यावर राज्य करितात. परंतु सांस्कारिक आपलेपणानें तिचा मोठा भाग लाट या नांवानें प्रसिद्ध आहे.

विक्रम संवताच्या दुसऱ्या शतकांत टालेमी या देशास लारिका (लाटिका?) या नांवानें ओळखतो[२१]. पण रुद्रदामनच्या काळांत (वि. सं. १९९–२१४) हें अभिधान शिष्टांनीं स्वीकारल्याचें दिसत नाहीं[२२]. मत्स्यपुराण व मार्कंडेयपुराण[२३] यांवरूनहि वि. सं. ६८० मध्यें पूर्वेस माळव्यापासून तों उत्तरेस गुर्जरदेशापर्यंत लाट निराळें झाल्याचें दिसतें[२४]. आणि मूळराज सोळंकीनें गुर्जरसत्ता पाटणमध्यें स्थापन केली तोंपर्यंत त्याच नांवानें हा प्रदेश ओळखला जात होता असें वाटतें.

४

आतांपर्यंत परदेशी सत्ता, धर्म आणि संस्कृति यांचा रस करण्यासाठीं आर्यावर्तानें अनेक सबल साधनें मिळविलीं होतीं. यांतील पहिलें साधन म्हणजे

---

१६ B. G. H. P. 465. १७ B. G. H. p. 465; JBRAS. XXI; p. 413. १८ B. G. H. p. 467 Hieun Thsang's Travels. १९ आनंदशंकर ध्रुव 'गुजरात संस्कृत साहित्य.' अलबरूनी B. G. H- p. 473. २० B. G. H. App. III. २१ टॉलेमी B. G. H. p. 539. २२ रुद्रदामनचा गिरनारचा लेख २३ मार्कंडेयपुराण ५७-५२ मत्स्यपुराण ११४, ४६-५१ २४ पुलकेशी २रा. लेख इ. स. ६३४ (?) V III I. A. 237.

ब्राह्मण होय. हल्लीं यांना स्वार्थी असें समजतात. परंतु यावरून त्यांचें ऐतिहासिक महत्त्व समजणें शक्य नाहीं. अनेक युगें झालीं तरी ब्राह्मणांनीं स्वत्व गमाविलें नाहीं. त्यांनीं गृहसंसार करून सामाजिक प्रगतीशीं संबंध ठेविला आहे. त्यांनीं स्वतःच्या जातीला भूदेव समजून दैवी निश्चलता प्रकट केली आहे. अवश्यकतेप्रमाणें त्यानें प्रगति केली असून स्वसंस्कारहि संभाळले आहेत. त्याच्या कार्यदक्षतेंत चाणक्याचें प्रतिबिंब आहे, व त्याच्या क्रोधांत और्वाचा संताप आहे; असें असूनहि त्याच्या साहित्य-प्रेमांत वेदव्यासाचा उत्साह दृग्गोचर होतो, त्याच्या सांसारिक रचनेंत याज्ञवल्क्याची आवड आणि वसिष्ठाचें संस्कारप्रेम आहे.

वर कथन केलेल्या वस्तुस्थितींत मुळींच अतिशयोक्ति नाहीं. युगें आलीं व गेलीं. साम्राज्यें स्थापन झालीं व लयासहि गेलीं. परंतु ब्राह्मणानेंच भिक्षा मागून विद्या प्राप्त करून घेतली व मूठभर तांदूळ घेऊन विद्या, धर्म आणि संस्कार यांचा प्रसार केला. त्याच्या प्रेरणेचें मंदिर तक्षशिला, काशी अथवा उज्जयिनी असून त्याचें कार्यक्षेत्र सर्व आर्यावर्तांत होतें. परदेशी प्रजा वाटेल तितकी प्रतापी होती तरी त्याच्या संसर्गांत येतांच स्वत्व गमावून बसली. तो मंत्री वा योद्धा, गुरु वा भिक्षुक, कवि वा इतिहासकार यांपैकीं वाटेल तें स्थान शोभवीत असे व दोनच पिढ्यांत वाटेल त्याला आर्यत्वाचे पाठ शिकवूं शकत होता. शक, हूण, ग्रीक, गुर्जर हे सगळे अवघ्या पन्नास वर्षांत याच्याच प्रतापानें आर्य बनून आर्यसमाजांत स्थान पावते झाले.

ब्राह्मणानें संस्कृति कशी संभाळली हें पाहण्यासारखें आहे. प्रथम, हा जेथें गेला तेथें संस्काराचें केन्द्र त्यानें स्थापन केलें. आज जेथें इंग्रज जातो तेथें चिमुकलें लंडन निर्माण करतो, त्याचप्रमाणें ब्राह्मण जेथें गेला तेथें त्यानें काशी उत्पन्न केली. उज्जयिनी, वडनगर, श्रीपाल, सिद्धपुर या सर्व ठिकाणीं त्यानें संस्काराचीं ठाणीं स्थापन केलीं. राजसत्तेचीं केन्द्रें हुसकून लाविण्यांत आलीं पण या ठाण्यांना कोणीं स्पर्शहि करूं शकला नाहीं.

दुसरें, हा जेथें गेला तेथें त्यानें संस्कृत भाषा आणि साहित्यभक्ति बरोबर नेली. देव बदलले, सांप्रदाय भिन्न झाले, परंतु विद्या, संस्कार, धर्म आणि शुद्धि संस्कृत भाषेंतच सांठवून ठेविलेली होती. आणि संस्कृत भाषेविषयींचें हें प्रेम उत्पन्न करण्याची जादू त्यानें निर्माण केली. आर्यावर्तांत आज संस्कृताचें अप्रतिम व अढळ स्थान आहे. लॅटिन भाषेसारखी संस्कृत भाषा गतयुगाची भाषा झाली नाहीं. संस्कृत म्हणजेच इतिहास, जीवन, धर्म आणि भावना होय; आर्यांच्या आत्म्याला ओळखण्याचें साधनहि संस्कृतच होय; ऐहिक प्रेरणा व पारलौकिक मोक्षमार्ग संस्कृतच होय आणि संस्कृत म्हणजेच आर्यावर्ताच्या ऐक्याचा व स्वत्वाचा पाया. हा सगळा प्रताप ब्राह्मणांचा होय. प्राकृत भाषेचे अभिमानी बौद्ध आणि जैन यांससुद्धां विद्या व धर्म यांच्यासाठीं संस्कृताचा अभ्यास करणें अपरिहार्य होतें. आणि आजसुद्धां हिंद देशांतील भाषा सबळ व समृद्ध करण्यास पाश्चात्य भाषेच्या उपासकांना संस्कृत भाषेचीच मदत विशेष होते.

ब्राह्मणांनीं प्रकट केलेलें दुसरें बल म्हणजे त्यांनीं रचलेल्या पौराणिक कथा. त्यांत कांहीं इतिहास, कांहीं भावना, कांहीं काव्य यांचें मिश्रण असल्यामुळें या पांचव्या वेदानें इतिहास, जीवन, धर्म व संस्कार यांना जिवंत ठेविलें इतकेंच नव्हे पण परसंस्कार व स्वतःचा पराभव यांचाहि विसर पाडला. या साहित्यानें ऐतिहासिक सातत्यहि उत्तमप्रकारें संभाळलें. कोणताहि परदेशी राजा चंद्र किंवा सूर्यवंशांत दाखल झाला आणि वाटेल त्या ब्राह्मणाला प्राचीन ऋषीचें गोत्र प्राप्त झालें. कल्पांतासारख्या विप्लवांतूनहि समाज आणि संस्कृति यांची एकतानता निगडित राहिली. या साहित्यांत उत्पन्न केलेल्या पारदर्शकतेनें वेदकाल व भारतकाल यांचेंच अंग आजहि चालू आहे असा भास उत्पन्न झाला.

याशिवाय ब्राह्मणांनीं दुसऱ्या दोन भावना उत्पन्न केल्या. त्यांपैकीं एक म्हणजे ब्राह्मणाची सर्वश्रेष्ठता. ही सर्वश्रेष्ठताच त्याच्या सत्तेचें मूळ होतें. ही श्रेष्ठता नुसती पोकळ नसून शक्ति व समाजसेवा या दोहोंवर उभारलेली श्रद्धा होती.

ब्राह्मणांनीं उत्पन्न केलेली दुसरी भावना सतीत्वाची होय. संस्कृतिकाराच्या अचुक नजरेनें त्यानें असें हेरलें कीं, संस्कार शुद्ध ठेविण्याचीं मुख्य स्थानें गृह आणि गृहिणी हींच होत. सतीत्वाची भावना हीच सर्व नीतींचें सार होय असें त्यानें शिकविण्यास प्रारंभ केला; व त्यायोगें जाति आणि संस्कार यांची शुद्धि संभाळण्यासाठीं फार मोठें बल प्रकट झालें.

आर्यावर्तांत व विशेषतः गुजराथेंत ब्राह्मणांनीं दुसरें एक सांस्कारिक बल प्रकट केलें. हें बल म्हणजे शैवमत होय. वेदकालीन सरळ व शुद्ध धर्म अज्ञान वा अनार्य जातीला योग्य नव्हता. आणि बौद्धमत पाहिजे तसें शक्तिप्रधान बनलें नाहीं, आणि यामुळेंच दुसऱ्या शतकापासून पाशुपत मताचा प्रचार सुरू झाला. इसवी सनाच्या दोनपासून पांच शतकापर्यंतच्या काळांत भृगुकच्छ प्रदेशांत अवतरलेल्या लकुलीश कीं नकुलीश नांवाच्या धर्माचार्यानें पाशुपत मताला स्पष्ट स्वरूप दिलें असें वाटतें. आणि याच माहेश्वरी मतानें परदेशी आणि परसंस्कारी ग्रीक, हूण व शक या विजेत्यांना जिंकलें असें दिसतें. गुप्त सम्राट वैष्णव होते. परंतु गुजराथेच्या क्षात्रपांच्या काळांत व वल्लभींच्या भरभराटींत पाशुपत मताचें प्राबल्य फारच झालें असें वाटतें. नर्मदातीर व सोमनाथ हीं या सांप्रदायाचीं पीठें होतीं. ब्राह्मणांनीं पौराणिक साहित्य व पाशुपतमत यांच्या संयुक्त बलानें आर्यसंस्कारांची भट्टी उपर्युक्त ठिकाणीं सतेज ठेविली असें स्पष्ट दिसतें.

गुजराथेंत आर्यसंस्कृतीचें दुसरें मोठें साधन म्हणजे जैन साधु होत. कित्येक चक्रवर्ती राजांनीं जैन मत स्वीकारिल्याचें इतिहास सांगतो. असें असूनहि जैन धर्माचा राजसत्तेशीं फारच थोडा संबंध दिसतो. प्राचीन काळापासून गुजराथ ही जैन मताची पुण्यभूमि होय असें मानण्यांत येत असे. यावरून या मताचें प्राबल्य येथेंच विशेष

होतें आणि आहेहि. ज्या सांस्कारिक बलानें या मताचें स्वरूप धारण केलें त्याचें मुख्य अंग साधुच होते.

संन्यस्त आणि संसारी, भिक्षु व संघ यांच्यामध्यें ब्राह्मणाचें स्थान होतें. परंतु जैन मतानें हें स्थान ठेविलेंच नाहीं. संन्यासी साधु हाच त्या मतावलंबींचा धर्मगुरु झाला. आणि गुजराथेच्या संस्कृतीला वैशिष्ठ्य आणण्यांत त्यानें फार मोठा भाग घेतला. त्यानें वैराग्याची भावना सतेज ठेविली. त्यानें विद्येचा संग्रह केला. आणि तो सामान्य वर्गांतील असल्यानें त्या वर्गाबद्दल त्याला सहानुभूतीच वाटे. संन्यासी जीवनामुळें तो स्वतः अलिप्त राहून संघांत समानतेची भावना पसरूं शकत होता. अहिंसा मंत्र हा त्याच्या सांप्रदायाचा अमूल्य सिद्धांत होता आणि त्याच मंत्राच्या जोरावर तो समाजाचीं दुःखें दूर करण्याचा प्रयत्न करी.

त्याला राजसत्तेची मदत नसल्यामुळें जनतेचीं अंतःकरणें जिंकण्याचा तो प्रयत्न करी. आणि हा प्रयत्न करीत असतांच प्रबंधासारखें लोकसाहित्य तो रचीत असे. तो संसारी नसल्यामुळें परिस्थितीशीं समरूप होऊं शकला नाहीं. त्याला संस्कृताचें प्राधान्य मान्य करावें लागलें; पौराणिक कथांत सुधारणा करून त्यांचा स्वीकार करावा लागला. समाजांत व संस्कृतींत पक्ष उत्पन्न करण्याचे त्याचे प्रयत्न निष्फळ झाले. त्यामुळें दुसऱ्या सगळ्या सांस्कारिक बलांचाहि त्याला वाढत्या प्रमाणांत स्वीकारच करावा लागला.

या व इतरहि कित्येक कारणांनीं गुजराथेंत विद्या अथवा साहित्य यांची अभिवृद्धि होऊं शकली नाहीं. वर्गशासनाची स्थापना करतां आली नाहीं. राजसत्ता अनियंत्रित झाली नाहीं. ब्राह्मणेतर वर्ग संस्कारांत मागें राहिले नाहींत. यादव आणि यौधेय यांनीं समाजांत स्थापन केलेली समानता व स्वातंत्र्य अदृष्ट झालें नाहीं. इतकें असूनहि सांस्कारिक अहंभाव कायम राहिला आणि परसंस्कार शुद्ध करण्याची उष्णता जशीच्या तशीच सतेज राहिली.

५

वि. सं. १०१७ मध्यें गुर्जर मूळराज सोळंकी (१०१७–१०५३) पाटणच्या गादीवर विराजमान झाला. मध्यकालीन गुजराथच्या महत्तेच्या या विश्वकर्म्यानें पाटणची सत्ता अजिंक्य केली इतकेंच नव्हे परंतु सोमनाथाला गुजराथेचा इष्टदेव म्हणून स्थापन केला. सिद्धपुराला धर्मक्षेत्र बनविलें, देशोदेशींचे ब्राह्मण गुजराथेंत आणून वसविले, भंग पावलेल्या भिन्नमालेची विद्या व संस्कार यांना आश्रय दिला, आणि नवआर्यावर्ताच्या सांस्कारिक वन्हीला प्रज्वलित केलें. ही ज्वाला मूळराजाचा प्रपौत्र सिद्धराज याच्या कारकीर्दीपर्यंत अधिकाधिक वाढतच गेली. सम्राट सिद्धराजानें गुजरातेची सीमा कार्तवीर्याच्या साम्राज्यसीमेपर्यंत नेऊन ठेविली. उज्जैन व अजमीर गुजराथेचे अंकित झाले व बुंदेलखंड आणि कोल्हापूर येथें पाटणची विजयघोषणा श्रवण होऊं लागली.

गुजराथेची सत्ता जसजशी पसरली तसतसा तिचा व्यापार आणि तिचें साहस यांचाहि चोहोंकडे पसाराच झाला. व त्यामुळें तिची समृद्धि व तिचा गौरवहि वृद्धिंगत

झाला( राष्ट्रीय भावना सर्वत्र पसरलेली दिसते. आणि साहित्य व संस्कार या उभय-द्वारांनीं ती प्रबल झालेली भावना व्यक्त स्वरूपांत चमकूं लागली. नव-आर्यावर्ताच्या सनातन जीवनामध्येंसुद्धां हा समय असाधारण म्हणून वाटल्याशिवाय राहत नाहीं.

त्या काळचा इतिहास लुप्त झालेला आहे, त्याची अगदीं विस्मृति पडलेली आहे, किंबहुना तो अगदीं छिन्नभिन्न झालेला आहे. तथापि त्यांतूनहि दोन व्यक्ती अगदीं स्पष्टपणें दृग्गोचर होतात व त्यांच्याच ठायीं त्यावेळची संस्कृति प्रतिष्ठित झालेली दिसते.

यांतील एक व्यक्ति बृहस्पति होय. हा कान्यकुब्ज ब्राह्मण होता. हा सर्व-शास्त्रविशारद असून पाशुपत मताचा आचार्य होता. सोमनाथपाटणांतील पाशुपत-मठाचा तो अधिपति होता. सिद्धराज व कुमारपाल यांचा तो मित्र होता. व माळवा-धिपतीचा गुरु होता. याच्या पराक्रमाची तपशीलवार माहिती अद्यापि उपलब्ध झालेली नाहीं. तथापि सिद्धराजाच्या अंतापर्यंत याच्याच प्रतापानें शैव मताचे प्राबल्य स्थिर राहिलें होतें असें दिसतें.

याच्याहून निराळ्या प्रकारची दुसरी व्यक्ति होती. ती धंधुक्याची राहणार असून मोढ वाणी जातीची होती. तिचें नांव हेमचंद्राचार्य हें होय. मुत्सद्दीपणांत गुर्जर मंत्र्याची तो बरोबरी करूं शकणारा नव्हता. राज्यसंस्थापकाची दृष्टिहि याला नव्हती. तथापि स्वतःचा सांप्रदाय पसरण्याची शक्ति, सांस्कारिक भावना प्रगट करण्याची कला, विद्येची सेवा, बुद्धीची तीक्ष्णता, अहिंसेचा प्रचार, तपाची सिद्धि व शब्दब्रह्माची अव्यभिचारिणी भक्ति या सर्वांमध्यें या 'कलिकालसर्वज्ञा'नें स्वतःमध्यें असलेले विशिष्ट आर्यत्वाचे श्रेष्ठ आदर्श मूर्तिमंत उत्पन्न केले. याची शास्त्रज्ञता, याचें वैराग्य, आणि याचें वाक्पाटव ऐकून व पाहून जनतेला सत्ययुग असल्याचा भास झाला. ब्राह्मण हे याचे प्रतिस्पर्धी होते. त्यांनाहि आपल्या हातांतील संस्कारांचा मक्ता निसटून जातो कीं काय असें वाटूं लागलें. पाटणची सत्ता याच्या स्वाधीन झाली. अहिंसेच्या नादांत यानें राज-बल नष्ट केलें; परंतु गुजराथेस संस्कार, तप व ज्ञान यांची मातृभूमि बनवून उज्जैन, काशी व काश्मीर यांचा गर्वपरिहार केला.

याच्याच प्रेरणेनें कुमारपालानें वीरतेचा त्याग करून अहिंसात्मक निर्बलतेचा स्वीकार केला. गुजराथेनें शस्त्रसंन्यास केला व सिद्धराजाचें साम्राज्य नष्ट झालें. नष्ट होत चाललेल्या वीरज्वालेनें वस्तुपाल व तेजपाल यांना पुढे केलें, परंतु विधिघटना निराळीच असल्यानें "अल्लाहो अकबर" ही रणगर्जना श्रवणपथावर येऊं लागली.

या युगांत गुजराथेचें व्यक्तित्व स्पष्टपणें सांगतां येईल असें दिसूं लागलें. माळव्याच्या परमाराशीं अनंत विग्रह झाल्यामुळें माळवा व गुजराथ कायमचे वेगळे झाले. सपादलक्ष व राजपुताना तर वेगळेच होते. पाटणच्या राजांनीं कांहीं काल जैन-मत स्वीकारिलें. स्वतःच्या मताच्या विजयासाठीं किंवा स्वतःचें महत्त्व संभाळण्यासाठीं

त्या मताच्या मंत्र्यांनीं शेजारच्या हिंदुराजांपासून वेगळेपणा पत्करला; त्यामुळें गुजराथेचे विशिष्ट संस्कार अधिक निराळे व स्पष्ट झाले. गुजराथेचें मूळचें जीवन इतरांपेक्षां किंचित् भिन्न असें मूळचेंच होतें, पण आतां तें अधिक भिन्न झालें, व कार्तवीर्याचा अनूप, आनर्त व सौराष्ट्र, परशुरामाचा शूर्पारक आणि परान्त हे प्रदेश लाट या नांवानें अस्पष्टपणें व्यक्तित्व पावले होते ते सिद्धराज जयसिंहाची गुजराथ या नांवानें अनन्त-कालासाठीं स्पष्ट सांस्कारिक व्यक्तित्व पावले. या वेळेपासून गुजराथेची प्रजा व संस्कृति, भाषा व आत्मा एक व अविभाज्य होऊन राहिलीं.

६

परंतु अरबस्तानांतलि पैगंबराचा संदेश घेऊन परस्थ लोक हिंदवर तुटून पडले. हिंदचें धन लुटलें गेलें, त्याची स्वतंत्रता नष्ट होऊं लागली, त्याचा धर्म व संस्कार यांवर मोठी आपत्ति आली. या परसंस्काराचे बल दुर्धर्ष होतें. प्रत्येक वर्षीं विदेशी लोक धन व राज्य यांच्या लोभानें येथें येऊं लागले, येथील लोकांना बाटवूं लागले, आणि दररोज लहान मोठ्या राज्यांची उलथापालथ करूं लागले. आणि या प्रकारें प्रत्यहीं नवी संस्कृति बळजबरीनें लोकांच्या बोकांडीं बसविण्याचा प्रयत्न होऊं लागला.

या संस्कृतीच्या आगीनें तुर्कस्थान व इराण येथील जुने संस्कार जळून भस्म झाले होते. आर्यसंस्कृतीच्या जीवनांत मोठा आणीबाणीचा प्रसंग प्राप्त झाला. आर्य-वीरांचे आत्मभोग, वीरांगनांची निश्चलता आणि संस्कार-रक्षकांची निश्चयात्मकता यांची साक्ष गांवोगांवच्या कहाण्या देऊं लागल्या.

गुजराथेनें दूर राहण्याचा प्रयत्न केला, पण तो सिद्धीस गेला नाहीं. वि. सं. १३५३ मध्यें अनहिलवाड पडलें. वि. सं. १३६२ मध्यें गुजराथ सर झाली. वि. सं. १४५९ मध्यें गुजराथेच्या गादीवर स्वतंत्र मुसलमान राजा बसला.

आर्यत्वाचा अग्नि नेस्तनाबूत करण्याचा प्रयास सर्व आर्यावर्तांत करण्यांत आला त्याचप्रमाणें तो गुजराथेंतहि झाला. आणि सगळें आर्यावर्त संस्कारांच्या रक्षणासाठीं तत्पर झालें.

या संरक्षणासाठीं समाजास पहिल्याप्रथम स्थिर स्वरूप देण्यांत आलें. जीव-नाला निश्चल घटनेंत स्थापण्यांत आलें. जातिव्यवस्था कडक केली गेली. रूढींना शाश्वत नियमांचें स्वरूप देण्यांत आलें. संरक्षक वृत्ति हाच जीवनाचा मंत्र होऊन बसला. स्वातंत्र्य हें पापरूप होय असा धर्माचा सिद्धांत ठरला. आणि या सर्व नवीन भाव-नांना धर्मशास्त्रामध्यें स्थान देण्याची सुरुवात झाली.

याबरोबरच सांस्कारिक असहकारहि उदय पावला. मुसलमानी संस्कारांचें क्षेत्र शक्य तेवढें आकुंचित करण्यांत आलें, व त्याच्याशीं कमींत कमी संबंध ठेविण्यांत आला. व्यापारी सत्ता महाजनांनीं हातांत घेतली, गांवाचे अधिकार पंचायतांनीं स्वीकारिले, आणि सामाजिक व नैतिक सत्ता जातींच्या ताब्यांत गेली. एकादा प्रधान

होऊन नबाबाशीं कानगोष्टी करी, परंतु घरीं आल्यावर स्नान केल्याशिवाय त्यास भोजन मिळत नसे. बाहेर तो खुशाल नबाबाची कृपा संपादी, पण त्याचें जीवन त्याच्या जातभाईंच्या हातीं असे व त्या सर्व जातीवर ब्राह्मणच आपली सत्ता चालवीत. परसंस्कृति राजसिंहासनावर फक्त होती, संसारांत तिला स्थान नव्हतें. शिक्षण पूर्वीप्रमाणेंच ब्राह्मणांच्या आधीन राहिलें. जिवंत परसंस्कारांना जीवनक्रमांतून अगदीं अलग ठेविण्याचें मानसिक वातावरण त्यांनींच निर्माण केलें. भाषा, साहित्य आणि संस्कार यांच्यांत परसंस्कारांचा संचार शक्यच नव्हता आणि भाषा व साहित्य यांची अधिष्ठात्री संस्कृतच कायम राहिली.

परसंस्काराचें बल क्षीण करण्यासाठीं त्याच्या जन्मभूमीशीं त्याचा असलेला संबंध शक्य तेवढा कमी करण्यांत आला. वि. सं. १४५९ मध्यें महंमदशहानें गुजराथ स्वतंत्र केली व दिल्लीशीं आपला असलेला संबंध तोडला. तेव्हांपासून मुसलमान हे गुजराथेचे जेते म्हणून व राहतां वतनी म्हणून समजले गेले. हिंदूंचा छळ कमी झाला. धार्मिक असहिष्णुता नांवाचीच राहिली. आणि बाटलेले हिंदू धर्मानें मुसलमान झाले तरी संस्कारांनीं हिंदूच राहिले. बोहोरे, मोलासलेम, गिराशिये, खोजा, कच्छीमेमण हे नांवाचेच मुसलमान आहेत, आणि हीच गुजराथच्या संस्कृतीची खुबी होय. विजेत्यांवरहि या संस्कृतीनें विजय मिळविला. अहमदाबाद वसविण्यांत अहमंदशहाच्या ( वि. सं. १४६८–१४९९ ) अंतःकरणांत मुसलमानांपेक्षां रजपुतांचा तेजस्वीपणाच अधिक होता. आणि आज गुजराथेचा शहा दुसरा मुजफर ( वि. सं. १५६९–१५८२ ) याचें चारित्र्य गुजराती संस्कृतीच्या इतिहासांत अलंकारासारखें शोभा देत आहे.

याशिवाय विजयासाठीं तत्पर असलेल्या आर्यसंस्कृतीच्या आत्म्यानें एक नवी प्रवृत्ति आदारिली. जीवनाचा प्रवाह अचेतन न व्हावा, हृदयाचा उत्साह दडपून न जावा, व संस्कार जिवंत राहावा यासाठीं एक प्रचंड बल त्यानें प्रकट केलें. या बलानें धर्मसांप्रदाय स्थापिले, त्यानें एकाच व्यक्तीच्या आसमंताद्भागीं संस्कृती रचण्यास सुरुवात केली, त्यानें एक भावना उत्पन्न केली, व त्या भावनेनें शेवटीं एका पुस्तकाचें स्वरूप धारण केलें. श्रीमद्भागवत हेंच तें पुस्तक होय.

हिंदु कथांमध्यें श्रीकृष्णानें हळू हळू मध्यस्थस्थान मिळविलें. ऐतिहासिक दृष्टीनें श्रीकृष्ण–वासुदेव हा यादवांचा नायक होता. विष्णुभक्त गुप्तांच्या काळापासून त्याच्यावर दैवी लक्षणांचा आरोप केला जात होता. विष्णूचा आठवा अवतार कृष्णद्वैपायन व्यास होता त्याच्या ऐवजीं श्रीकृष्ण वासुदेव झाला. महाभारतांतील मुत्सद्दी वीर मत्स्यपुराणांत (सुमारें ५ वें शतक) दैवी झाला आणि यानंतर एक दोन शतकांनीं रचलेल्या विष्णुपुराणांत श्रेष्ठ बनला. भागवतानें त्याला देवाधिदेव, योगींद्र आणि पुरुषोत्तम असें तिहेरी पद दिलें. त्याच्या नांवानें आर्यावर्तांत संस्कारांचा एक प्रचंड तरंग

पसरला. जीर्ण सांप्रदायांत नवीन जीव आला. नवे सांप्रदाय उत्पन्न झाले. नवें साहित्य प्रगट झालें आणि मृतप्राय साहित्य नव जीवनानें उठून बसलें.

दरबारांतून संस्कृत भाषेला अर्धचंद्र मिळाला होता, परंतु धार्मिक व्यासपीठ मात्र तिनेंच मजबूत केलें होतें. स्वतःच्या प्रेरणेनें प्रांतिक भाषेला नवजीवन तिनेंच दिलें. हा सर्व परिणाम श्रीकृष्णाच्या नांवाचा व भागवत ग्रंथाचा होय.

गुजरार्थेत भालणानें (वि. सं. १४८५–१६९५) याच भागवताच्या व कृष्ण-भक्तीच्या प्रेरणेनें नवीन साहित्ययुग सुरू केलें. मीरा व नरसिंह यांची काव्यें याच प्रेरणेनें रचिलीं गेलीं इतकेंच नव्हे तर त्यांचा स्वीकारहि झाला.

कवि व कथेकरी यांच्या मार्फत आर्यभाषा व संस्कार यांचा आत्मा गुजराथी साहित्याच्या द्वारें संस्कारांत उतरला ! प्रेमानंदानें चिमुकल्या रंगभूमीवर भगवान् वेद-व्यासाचा पाठ दाखविण्याचा अल्प प्रयत्न केला. आणि दयारामापर्यंत म्हणजे मुसल-मानी युग पूर्ण होईपर्यंत या नवीन बळाची प्रेरणा कायम राहिली.

या बटाच्या भव्यपणाचें ज्ञान होण्यासाठीं प्रेमानंदासारख्या आदर्श व्यक्तीच्या मनोदशेची परीक्षा करूं या ! भूत कालांतील पराक्रमी कारकीर्द, अपूर्व साहित्य आणि विशुद्ध भावना यांच्यायोगें जाज्वल्यवान् झालेल्या आर्यसंस्कृतीचा तो वारस होता, प्रतिनिधि होता. सदाचारी पिता व सती माता यांनीं कित्येक युगापासून त्याची महत्ता संभाळली होती. त्याची महत्ता भूतकाळांतील नसून सदासर्वदा विजयी अशी होती. ती महत्ता परसंस्कारांना शुद्ध करण्यास तत्पर होती. त्याचें कान भूतकाळांतील प्रेरणेचें संगीत श्रवण करीत होते. त्याची दृष्टि भावी विजयावर स्थिर झाली होती. त्यानें अंतरांतील पडदे उघडून स्वतःच्या आत्म्याचें संस्कारी संगीत पसरून दिलें. त्यानें पाठशाळा उघडल्या. गांवोगांवीं कीर्तनें केलीं. रस्त्यारस्त्यांतून कथा केल्या. आणि घरोघरीं लोकगीतें गावविलीं. त्यानें धर्म संभाळला, ऐतिहासिक सातत्याचें रक्षण केलें, भाषा व साहित्य यांचें जतन केलें, प्रेरणा व आदर्श यांचें संरक्षण केलें आणि याच्याच प्रयत्नानें संस्कृतीच्या अमर आत्म्यानें गुलामगिरीची बेडी तोडून देशांत विजयी होऊन सर्वत्र संचार सुरू केला.

यावेळीं वैष्णव सांप्रदाय सुद्धां बलाचें अंग होऊन राहिला. १२ व्या शतकांत गीतगोविंद रचिलें. १३ व्या शतकांत बोपदेवानें भागवत व हरिलीला षोडश कला लिहिल्या. सं. १४६९त गुजरार्थेतील नृसिंहारण्य मुनीनें विष्णुभक्तिचंद्रोदय नांवाचा वैष्णव ग्रंथ निर्माण केला. सं. १५३५ मध्यें वल्लभाचार्य जन्मले. १५४१ त चैतन्य जन्मला. पंधराव्या शतकांत वैष्णव नरसिंह झाला. भालण व भीम यांच्यावरहि या संप्रदायाचा परिणाम दिसतो, इतकेंच नव्हे तर तो परिणाम दयारामा (सं. १८२३ पासून १९०८ पर्यंत) पर्यंत चालत आला आहे यांत वाद नाहीं. या संप्रदायाचे

शेवटले प्रतिनिधि सहजानंद स्वामी ( संवत १८३७ पासून सं. १८९६ ) झाले. त्यांच्यापर्यंत हा सांप्रदाय सांस्कारिक वळाप्रमाणेंच राहिला.

या सांप्रदायानें कित्येक महत्त्वाचे फेरफार केले. जैन व शैव या मतांत मध्यंतरीं कांहीं काळ जो विरोध उत्पन्न झाला होता तो या संप्रदायानें मिटवून टाकिला. यानें शैव मताचें अवडंबर व पाशुपत मताच्या नांवावर चालणारें पाखंड दूर केलें. तसेंच जैनांची शुष्कता आणि पृथक्पणा यांचाहि विसर पाडला. कृष्णभक्तीच्या रसानें शैव मतांत सरळता व जैन मतांत सरसता आणिली. एका साम्राज्याच्या पृथक् राहूं इच्छिणाऱ्या दोन शकलांना या सांप्रदायानें सांधून संस्कृतीच्या एकतानतेला विजय प्राप्त करून दिला.

हे नवे सांप्रदाय विस्मरण झालेल्या यौधेयांच्या समानता प्रेमाचे नवे अवतार होते. त्याचें कार्यक्षेत्र सामान्य वर्ग होता व त्याच्याच प्रेरणेनें जनता आपला उद्धार करून घेत होती. वर्णांमध्यें सांस्कारिक असमानता फारशी नव्हतीच. तथापि जी कांहीं थोडी होती तीहि या बलानें नष्ट केली. गुजराथ्यांत शैव, जैन किंवा इतर सांप्रदायांचे अनुयायी यांच्यांत आज जी समसंस्कारिता दिसते तिचें कारण हा संप्रदाय होय.

इतर प्रांतांत अज्ञान वर्गाची जी अधम व अस्पृश्य स्थिति दिसते ती गुजराथेंत दिसत नाहीं याचें कारण ही संस्कृति होय. या संस्कृतीनें पौराणिक, जैन व वैष्णव मतांना अधमोद्धारक बनविलें.

या युगांत जीवदयेचे सिद्धांत पुस्तकांतच न ठेवितां जैन साधूंनीं त्यांचा सतत प्रसार करण्याचा प्रयत्न केला असें दिसतें. मुसलमानांचा जुलमी अंमल असतांनाहि सहिष्णुता, समभाव, दुःख व निर्बलता यांच्यासंबंधीं सहृदयता हीं गुजराथी संस्कृतीचीं मुख्य लक्षणें पसरण्यासाठीं अनेक प्रयोग करण्यांत आले. आणि यांचाच परिणाम म्हणजे जीवदयेविषयीं सहानुभूति व दुःख दूर करण्याची तत्परता हीं ज्या प्रमाणांत गुजराथेंत दिसतात त्या प्रमाणांत इतरत्र कोठेंहि दिसत नाहींत, हा होय.

मुसलमानी सत्तेनें तिची राजकीय सत्ता हरण केली, वैष्णव संप्रदायानें तिची सामाजिक सत्ता घेतली. तथापि आर्यसंस्कृतीमधील परम भावना जें तप व वैराग्य यांचें एकांतांत सेवन होऊं लागलें. तिचा मेंदु संकुचित होता, त्याची असहिष्णुता मात्र विशेष होती. तथापि स्वतःच्या दैवी पदाचें अधिष्ठान सिद्ध करण्यासाठीं तिला वैराग्य-प्रधान वातावरण कायम ठेवणें भाग पडलें.

याप्रमाणें हें युग चालूं राहिलें. मराठे आले, पण त्यांनीं बडोद्यांत राज्य-स्थापना करण्यापलीकडे कांहीं केलें नाहीं. परंतु या युगाच्या सांस्कारितेचे प्रतिनिधि शोधून पाहतां तीन व्यक्ती दिसतात.

एक व्यक्ति पालणपुरचे ओशवाल—जैन सूरीश्वर हीरविजय सूरीजी. सं. १५८३ मध्यें त्यांचा जन्म झाला व गुजराथेच्या बिकट ऐतिहासिक प्रसंगांत त्यांचें जीवन व्यतीत झालें. अहमदाबादचे मुसलमान राजे आपसांत लढले व सं. १६२८ मध्यें गुजराथेचें स्वातंत्र्य नष्ट झालें व गुजराथ ही अकबराच्या साम्राज्याचा एक विभाग होऊन राहिली. संस्कृति पुनः संकटांत आली. जैन मतानें ज्या पूज्य मूर्ती प्रकट केल्या त्यांत हीरविजयसूरि ही एक विशुद्ध व अप्रतिम मूर्ति होय. तपाच्या भावनेंत श्रद्धेच्या निश्चलतेंत, निःस्वार्थी जीवदयेंत किंवा परमार्थ परायणतेमध्यें या साधूचें स्थान इतर कोणत्याहि साधूपेक्षां कमी नव्हतें. चारहि बाजूंला त्यांच्या सात्विक प्रतापाचा परिणाम झाला. प्रत्येक गांवांत त्यांच्या नांवाचा जादु पसरला.

ज्ञानविलासी अकबर पादशहाच्या कानावर या साधूची कीर्ति जातांच त्यानें या अहिंसेच्या उपासकाला आमंत्रण पाठविलें. जंबूसरजवळील गांधार येथून निघून सूरि दिल्लीस चालत गेले. गुजरातेच्या संस्कृतीचा प्रतिनिधि मुसलमान सत्तेच्या प्रतिनिधीस भेटला. अकबरानें आपल्या स्वभावाप्रमाणें कांहीं कालपर्यंत सूरीला आपले गुरु केलें. सूरीनें अकबराला आर्यत्वाचे पाठ दिले; व गुर्जरसंस्कृतीला निर्भय करण्याचें वचन घेतलें.

भट प्रेमानंद ही दुसरी व्यक्ति होय. ( सं. १६९२—१७९० ) ज्या वर्गाचा हा सर्वोत्तम प्रतिनिधि होता त्याविषयीं मागें विवेचन झालेंच आहे. परंतु तो स्वतः कृष्णाच्या नांवानें अथवा भागवताच्या प्रेरणेनें प्रेरित झाला नव्हता. संस्कृत साहित्यानें तो प्रेरित झाला होता, त्याचें लक्ष गुजराथी साहित्याच्या विकासाकडे होतें. प्रत्येक पुराण, प्रत्येक कथा यांचा त्यानें उपयोग केला. त्यानें गुजराथेला विशिष्ट साहित्य दिलें; व त्या साहित्यद्वारां तिच्या संस्कृतीला सतेज केलें. संस्कृत वागीश्वरीनें त्याच्या जिव्हेच्या द्वारां गुजराती अवतार धारण केला.

तिसरी व्यक्ति स्वामी सहजानंद ( सं. १८३६—१८८६ ). वर्ण आणि धर्म यांच्यांतील विरोध यानें अटकाविला. असमानता दूर केली, ज्ञान व नीति यांचा प्रचार केला, अनाचार व दुःख यांना पायबंद घातला. याच्याच प्रतापानें गुजराथेंत नाममात्र अधमवर्ग राहिला. सहजानंद हा ब्राह्मण, विद्वान्, कट्टा वैष्णव आणि आदर्श संन्यासी असून सुधारक होता. त्यानें स्वतःच्या जीवनानें व कारकीर्दीनें गुजराथी संस्कृतीचीं आकर्षक लक्षणें सबल केलीं. गतयुगाच्या भव्यतेचा हा प्रतिनिधि नव्या युगाच्या उभऱ्यावर उभा राहिला.

आणि याप्रमाणें सुमारें चारशें वर्षांचें हें युग पूर्ण झालें.

७

नवीन युगाला सुरुवात झाली. परदेशी सत्ता व परदेशी संस्कार या दोहोंचा पुनः संचार झाला. वि. सं. १८१३ ( इ. स. १७५७ ) मध्यें प्लासीचें युद्ध झालें.

वि. सं. १८७४ ( इ. स. १८१८ ) मध्यें खडकीजवळ पेशव्यांची सत्ता नष्ट झाली. वि. सं. १९१३ ( इ. स. १८५७ ) मध्यें हिंदी स्वातंत्र्यासाठीं केलेला शेवटचा प्रयत्न थंड पडला. इंग्रजी राज्य आलें व पाश्चात्य संस्कृति दाखल करण्याचे प्रयोग सुरू झाले.

मुसलमानी संस्कारांत खलीफ उमरची हिंमत व प्रामाणिकता होती. पाश्चात्य संस्कारांत क्लाइव्हचें कापट्य व वॉरन हेस्टिंग्जची निर्दयता दृश्यमान होत होती. मुसलमानी संस्कृति काफर म्हणून जीव घेत होती, पाश्चात्य संस्कृति देवदूत होऊन आत्म्याचें हरण करूं लागली. एकीशीं झगडणें सहज होतें; परंतु दुसरीच्या समोर उभें राहणेंहि अशक्य झालें.

या परसंस्कारानें आदरिलेल्या कार्यक्रमानें आपलें जीवन, धर्म व संस्कार या तिघांच्याहि मुळावर घाव घालणारा होता. संस्कृत भाषेला पदच्युत करणें, स्वभाषेचा उच्छेद करणें, ब्राह्मणांची सत्ता नाहींशी करणें, सामाजिक भावनांचा विसर पाडणें, भूतकालाचें ज्ञान व तत्संबंधीं गर्व या दोहोंनाहि मूठमाती देणें, सांस्कारिक व राष्ट्रीय भावना कधीं अस्तित्वांतच नव्हत्या व नाहींहि अशी बुद्धि उत्पन्न करणें आणि स्वातंत्र्याचा परिपोष करण्याच्या निमित्तानें स्वच्छंद पसरणें हीं या कार्यक्रमाचीं अंगें होतीं.

याशिवाय दुसरींहि कांहीं अंगें प्रचलित केलीं गेलीं. प्लासीच्या लढाईपासून आपला खरा इतिहास सुरू झाला, आपल्या सुखाचा सूर्य इंग्रजी राज्यामुळेंच उगवला, आपल्या भावनांची सुरुवात इंग्रजी साहित्याच्या अभ्यासानेंच झाली, आणि आपला उद्धार विदेशी संस्कारांनींच होईल अशा अनेक समजुती उत्पन्न करण्यासाठीं श्रम सुरू झाले.

ही सगळी किमिया करण्याचें मुख्य साधन पादरीशाही शिक्षण होय. वि. सं. १८५५ मध्यें सीरामपुरांत पाद्र्यांनीं पहिली शाळा उघडिली. वि. सं. १८९१ मध्यें मेकॉलेनें इंग्रजी शिक्षणाला प्राधान्य दिलें. वि. सं. १९१३ त कलकत्ता, मद्रास व मुंबई येथें शारदापीठें स्थापन केलीं.

या शिक्षणामुळें आपण पागल बनून गेलों. आपण जंगली होतों, म्हणून या शिक्षणानें आपण सुधारणें अवश्य होतें. आपल्या येथें स्वातंत्र्य नव्हतें म्हणून या शिक्षणानें आपण स्वतंत्र होणार होतों. आपल्याकडे विद्या नव्हती म्हणून या शिक्षणानें आपण विद्यावान् होणार होतों. या शिक्षणानें आपणांस सुधारलें, आपणांस मनुष्य बनविलें, आपणांस मोक्षमार्ग दाखविला. आपण रानटी होतों, आपण अज्ञानी होतों, आपण चारित्र्यहीन होतों, आपल्यांत भावना नव्हत्या, आपणांस स्वातंत्र्य नव्हतें. मेकॉलेसारख्या जगदुद्धारकानें शिक्षणद्वारां वरील सर्व कमीपणा नाहींसा करून येथें सुवर्णयुग सुरू केलें.

वरीलपैकीं कांहींएक झालें नाहीं, तथापि तें झालें असें आपण मानिलें. अशा प्रकारें मानावयास लाविणें हेंच पाश्चात्य संस्कृतीचें उत्तम शस्त्र होय. ज्या देशानें

मुसलमानी संस्कृतीच्या त्रासाचा तिटकारा केला, तो देश या जादूंत फसला, पूर्वजांची कीर्ति कलंकित केली, आत्मसंस्कारांचा तिरस्कार केला व परसंस्कृतीच्या तेजांत आपण आंधळे होऊन गेलों.

आणि या सर्वांचा परिणाम काय झाला ?

आपल्या शारीरिक बळाचा ऱ्हास झाला, भूतकालच्या गौरवाबद्दल आपणांस प्रेम असे त्याचा विसर पडून परसंस्काराची भिक्षा मागूं लागलों. ज्ञान व शुद्धि यांवर रचलेली वर्णव्यवस्था मोडून टाकून श्रीमंत व गरीब असे वर्ण तयार झाले. ब्राह्मणांची विडंबना करवून साहेबाची पूजा करण्यास शिकलों, मर्यादेची भावना नष्ट होऊन स्वच्छंदी बनलों, मिताहारी जीवनाचा त्याग करून क्षुद्र वासनांच्या मागें लागून वेडे झालों. संस्कृत भाषेचा विसर पडून इंग्रजी भाषेचे भक्त बनलों. आपल्या साहित्याचा त्याग करून परसाहित्याचे गुलाम झालों. आपले इतिहास नष्ट होऊन परक्यांच्या इतिहासाचे जप जपूं लागलों. आपल्या रीतिभाति, आपले पोषाख, आपले आचार-विचार, आपल्या भावना व गौरव या सर्वांस कलंकरूप मानून त्यांचा त्याग करण्यास शिकलों. भूतकाळाचा विसर पाडून आपलें भविष्य या नवीन संस्कृतीनें विकत घेतलें.

परसंस्काराचें विष आपल्या नसानसांतून पसरूं लागलें. घरें भंगलीं, कुटुंबें छिन्नभिन्न झालीं, जाती तुटल्या, भावनांची भ्रष्टता दाखल झाली, संयम नष्ट झाला, व गौरव लय पावला. आपण नालायकांतील नालायक आहोंत अशी आपली खातरी झाली, परसंस्काररूपी मृगजलानें स्वतःची तृष्णा भागविण्याची आशा ठेवून निराधार-तेंत व अधमतेंत आपण पराश्रयी उद्धाराचीं निर्जीव स्वप्नें अवलोकन करूं लागलों.

आर्यसंस्कृतीच्या इतिहासांत हें प्रकरण कलंकरूप आहे. सर्व देशभर याप्रमाणें परसंस्कार विजय मिळवीत होता, त्याच वेळीं गुजराथेंत त्याचा कांहीं विशेष जोर चालला नाहीं. गुजराथेंतील संस्काररूपी विस्तव विझला नाहीं. गुजराथेंत संस्कारी भद्रलोक व असंस्कारी अधमलोक यांच्यांत अंतर नव्हतें. ब्राह्मण—ब्राह्मणेतरांत भांडण उपस्थित होण्यासारखी ब्राह्मणाची सत्ता येथें नव्हती. मुसलमान व हिंदु यांच्यामध्यें एकसंस्काराचें असें दृढ बंधन होतें कीं, तें तोडतां तुटणें अशक्य होतें. आपल्या समाजांत कित्येक अंशानें स्वतंत्रता होती. धर्मधुरेची असहिष्णुतासुद्धां कित्येक अंशानें संस्कृतीमध्येंच होती. पादरीशाही शिक्षणानें सर्व देशभर जेव्हां विजय मिळ-विला, तेव्हां येथील संस्काररूपी अग्नीवर फक्त राखच सांचली. नवआर्यावर्तांत अग्नि धगधगीत होता, प्रच्छन्न होता.

अग्नींतून एक स्फुलिंग उडालें. मोर्वीच्या ब्राह्मणाच्या स्वरूपानें हें स्फुलिंग दुसऱ्या ठिकाणीं गेलें. हें स्फुलिंग म्हणजेच महर्षि **दयानंद** होत.

शास्त्रीय ज्ञानाचें भांडार त्याच्या हातांत होतें, वागूदेवता त्याच्या जिव्हेवर वास करीत होती, वैदिक ऋषीसारखा त्याचा आत्मा प्रबल होता, व त्याची दृष्टि संस्कृतिकाराची होती. हा नरवीर नव आर्यावर्ताच्या या युगाचा पहिला प्रतिनिधि झाला.

चारहि बाजूस पसरून राहिलेल्या भयाचें त्यानें प्रमाण काढिलें.. ऐतिहासिक सातत्य व सांस्कारिक अहंभाव यांशिवाय संस्कृतीचा बचाव करणें त्याला अशक्य वाटलें. ब्राह्मणपूर्वजांच्या संस्काररक्षक वृत्ती त्याच्यांत उदित झाल्या. त्यानें सांस्कारिक अहंभाव पुनः प्रकट केला. शेंकडो वर्षांनंतर वेदांचा प्रताप जनतेस दाखवून, परसंस्काराचें जाल त्यानें प्रथम तोडलें.

परंतु दयानंदाचें ( वि. सं. १८८१–१८३९ ) कर्तव्यक्षेत्र गुजराथेच्या बाहेर होतें. हैहयाच्या या देशांत फक्त धर्मानेंच संस्कार रक्षिले जात असें कांहीं नव्हतें. तापीतटाकीं साहित्यक रूपानें एक आत्मा प्रकट झाला, त्याचें नांव नर्मद. नर्मद वीर होता, व समाजसुधारण्याचा त्यानें प्रयत्न केला. तो तत्त्वद्रष्टा होता व त्यानें स्वसंस्कारांत असलेलें रहस्य समजावून दिलें, इतकेंच नव्हे पण परसंस्कारांचा विसर पाडून स्वसंस्कारांना पुनर्जीवन देणारांची जी गुजराथी नामावळीची माला आहे त्या मालेंत नर्मद मेरूमण्यासारखा शोभूं लागला.

प्रस्तुतच्या साहित्य मन्वंतराचा मनु ही संज्ञा मी त्यास देतों. भागवतयुगाच्या आरंभीं भालणानें साहित्याला, संस्काराला संभाळण्याचें व व्यक्त करण्याचें साधन बनविलें होतें त्याचप्रमाणें नर्मदनें ( वि. सं. १८८९–१९४२ ) या युगांत नव्या प्रकारच्या साहित्याला तसल्याच उपयोगांत घेतलें. गुजराथच्या विस्मृत अहंभावनेला त्यानें स्मृति आणिली. त्यानें साहित्यसेवेला संस्कार रक्षणांत अग्रस्थान दिलें. पश्चात् त्यानें स्वधर्मरहस्यहि ओळखलें. त्यानें प्रकट केलेलें बळ नवलराम व इच्छाराम यांनीं सशक्त ठेविलें. आणि कित्येक वर्षांपासून तें 'गुजराती' ( मासिका ) च्या रूपानें आजहि परिणामकारक होत आहे. 'गुजराती' ( मासिक ) हें फक्त छापील पत्र नसून सांस्कारिक बल आहे असें म्हटल्याशिवाय गत्यंतर नाहीं.

परसंस्कारांना, स्वसंस्कारांना सतेज करण्यासाठीं दुसऱ्या एका ठिकाणीं एक ज्वाला उत्पन्न झाली. त्या ज्वालेला नडियाद सांप्रदाय असें म्हणतात. भूतकालांत संस्कार संरक्षणांतमध्यें नागरांनीं फारच मोठा भाग घेतला होता, हें आपण पाहिलेंच आहे. वल्लभीच्या समयापासून ते आर्यसंस्कृतीचे रक्षक होते. मध्यकालांत ते पाशुपत मताचे आधारस्तंभ होते. आणि मुसलमानी युगांत राजसत्तेच्या परसंस्काराचें विष निर्बल करण्यांत त्यांनीं फार मोठी सेवा बजाविली आहे. त्यांच्यांत विद्वत्ता व संस्कार चालत आले आहेत. परसंस्काराशीं त्यांनीं परिणामकारक रीतीनें असहकार केलेला आहे. या कारणांमुळें त्यांच्यांत सांस्कारिक अहंभावाची ज्योति पेटलेली होती.

नडियाद राजधानीचें शहर नसल्यानें राजकीय खटपटींनीं तेथील वातावरण क्षुद्र किंवा स्वार्थी झालें नव्हतें. तेथील रहिवाश्यांनीं संस्कृत भाषेला तिच्या आयस्थानीं स्थापण्यास, गुजराथी भाषेला जीवंत भाषा म्हणून मिरविण्यास व या रीतीनीं स्वसंस्कारांचा विजय साधण्यास भगीरथ प्रयत्न केले. मनसुखरामांचा (वि. सं. १८९६–१९६३) अवगणना करणें सोपें आहे. त्यांच्या संस्कृतप्रचुर गुजराथी भाषेची यट्टा करणें तर त्याहूनहि सोपें आहे. परंतु इंग्रजी युगाच्या सुरुवातींत, ज्यावेळीं परसंस्कार चोहोंकडेस आपली सत्ता प्रस्थापित करीत होते त्या वेळीं मनसुखरामांनीं संस्कृत भाषेची अव्यभिचारणी भक्ति केली, स्वसंस्कारांत निश्चल श्रद्धा बाळगिली आणि नवीन संप्रदाय स्थापन करण्याची हिंमत दाखविली यांतच त्यांचें महत्त्व आहे. युगयुगांतरांपासून ज्या सांस्कारिक शस्त्रांनीं आपल्याला जिवंत ठेवून आर्यसंस्कृतीला विजयी केलें होतें त्या शस्त्रांच्या खंडित धारेला त्यांनीं पुनः पाणी चढविलें. गोवर्धनराम (सं. १९११–१९६३) सुद्धां याच सांप्रदायांतील होत. त्यांच्यांतील उत्तमोत्तम अंश 'सरस्वतीचंद्रां'त व्यक्त झाले आहेत. या पुस्तकानें दहा वर्षें पर्यंत सांस्कारिक बळाचेंच रूप धारण केलें होतें. मणीलाल नभुभाई (सं. १९१४–१९५४) हे स्वतः या संप्रदायांतील असून त्याच्या आदर्शापासून त्यांनीं भिन्नता दर्शविली आहे. तथापि प्राचीन गौरव आणि ज्ञान यांचें स्मरण गुजराथला करून देण्यांत यांचें स्थान फार उच्च आहे. या संप्रदायाच्या मोठ्यांत मोठ्या शक्तीचें प्रदर्शन म्हणजे साहित्यपरिषद् ही संस्था असून नामशेष गुर्जरसंस्था हें या शक्तीचें शेंवटचें प्रदर्शन होय. हा उच्चाशयी संप्रदाय सांस्कारिक बल म्हणून आतां राहिला नाहीं, तथापि याच्या भावनांचा वारसा चोहोंबाजूस वांटला गेला असून त्यांतून अनेक प्रकारचें बळ प्रकट झालें आहे.

लोकांची आत्मप्रतिष्ठा हें गुजरातच्या संस्कृतीचें सुंदर लक्षण आहे. या लक्षणामुळेंच प्रतापी गुजराथेंत वर्गशासन किंवा एकाचीच सत्ता टिकूं शकत नाहीं. हा परिणाम हैहय, यादव किंवा यौधेय यांचाहि असूं शकेल. परंतु मंडलेश्वर, ब्राह्मण किंवा जैन यांपैकीं कोणीहि स्वतःच्या वर्गाची सत्ता दीर्घकाळपर्यंत बसवूं शकले नाहींत. व मुसलमान स्वधर्मीयांचें शासन येथें कायम करूं शकले नाहींत. आणि याच कारणामुळें कोणताहि एक वर्ग जात किंवा संस्कार यांचा मक्ता ठेवूं शकत नाहीं, समसंस्कारिता सर्व वर्णांत दृग्गोचर होते. आणि याच लक्षणामुळें, इंग्रजी राजसत्तेनें उत्पन्न केलेलें अंतर गुजराथी प्रजा समजूं शकली नाहीं व तिच्याकडून अपेक्षित धाक उत्पन्न झाला नाहीं.

पहिल्या प्रथम दादाभाई नवरोजी व नवरोजी फर्दुनजी यांनीं हें लक्षण संभाळिलें. व सं. १९२६ (सन १८७०) पासून या लक्षणाचे प्रतिनिधी फिरोजशहा मेहेता होऊं लागले. सं. १९४१ (सन १८८५) मध्यें त्यांनीं प्रेसिडेन्सी असोसिएशन स्थापन केली, तेव्हांपासून तो सं. १९६९ (स. १९१३) मध्यें 'क्रॉनिकल' पत्र सुरूं केलें तोंपर्यंत त्यांचें प्रतिनिधित्व चालू होतें. त्यांच्या राजकीय कारकीर्दी-

संबंधीं या प्रसंगीं कांहीं बोलणें अप्रस्तुत होय, परंतु ते जीवंत असेपर्यंत सांस्कारिक बलाची ते मूर्तीच होते. गुजराथी लोकांच्या प्रतिष्ठेचें संरक्षण त्यांनीं केलें, परदेशी राज्यकर्त्यांची श्रेष्ठता त्यांनीं मान्य केली नाहीं व समानतेचें वातावरण कायम ठेविलें. आज हिंदुस्थानांत इतर ठिकाणीं काळ्या-गोऱ्यामध्यें वाटेल तेवढी असमानता असेल व येथेंहि ही असमानता संभाळण्यासाठीं प्रयत्न झाले असतील; परंतु गुजराथेंत या असमानतेचा कोणीहि स्वीकार केला नाहीं व परदेशी राज्यकर्त्यांवर दैवी गुणांचा आरोपहि कोणी केला नाहीं.

फिरोजशहा मरण पावले व प्रेसिडेन्सी असोसिएशनचें प्रतिनिधित्व होमरूल लीगच्या मुंबई शाखेकडेस गेलें. या गुजराथी संस्थेनें गुजराथचे संस्कार वृद्धिंगत करण्यांत फारच मोठा भाग घेतला आहे. राजकीय उत्साहाबरोबर राष्ट्रीय व सांस्कारिक अहंभावहि प्रकट केला आहे. बॅ. महंमदअली जीनांचें निर्भय नेतृत्व व रा. शंकरलाल बँकरची सर्वव्यापी व्यवस्थाशक्ति हे या बलाच्या प्रशंसनीय स्वरूपाची किंचित् ओळख पटवितात.

या युगांत साहससुद्धां वृद्धिंगत झालें. सुरत व खंबायत यांचें साहस आणि अहमदाबादचें धन व कलाकौशल्य गतयुगांत शोभारूप होतें ते सर्व मुंबईस जाऊन राहिलें, व कुशपुत्रांचें साहस नवीन स्वरूपांत दिसूं लागलें. परदेशी व्यापार एवढा राजरक्षित खरा परंतु तो सुद्धां गुजराथेला साहसाच्या क्षेत्रांतून बाजूस सरकवूं शकला नाहीं.

या युगांत स्वसंस्कार न गमांवितां आपल्या समाजानें मुसलमानी युगांत कमाविलेल्या संरक्षकवृत्तीचा त्याग केला. इतर प्रांतांतून संकटें प्राप्त झालीं, परंतु फेरफार असा फारसा झाला नाहीं. आपल्याकडेस नियमितपणें पण जलदीनें प्रगती होत गेली. इकडेस धर्मांधता तर नव्हतीच. जातीची सत्ता नाममात्रच राहिली. कुटुंबपाशाशिवाय अडचणी नाहींशा होऊं लागल्या. संस्कृतीच्या विजयकालीं अवश्य एवढें व्यक्तिस्वातंत्र्य प्राप्त होण्याइतकी परिस्थिति प्राप्त झाली.

मुसलमानी युगांत स्त्रियांच्या संरक्षणासाठीं ज्याप्रमाणें सर्व हिंदुस्थानांत कांहीं बंधनें घालण्यांत आली होती, त्याप्रमाणें गुजराथेंतहि कांहीं बंधनें उत्पन्न करण्यांत आलीं होतीं. तथापि इतर प्रांतांप्रमाणें स्त्रियांना पडद्यांत ठेविण्याच्या चालीचा स्वीकार येथें झाला नाहीं. या युगांत संस्कार वृद्धिंगत करण्यासाठीं गुजराथेनें स्त्रियांना पुरुषांच्या बरोबरीचा दर्जा व स्वातंत्र्य देण्यास सुरुवात केली. आणि जो संसार संसारसुधारणा करण्याविषयीं दुसऱ्या प्रांतांत धार्मिक संप्रदायांची आवश्यकता वाटली ती संसारसुधारणा येथें स्त्रियांना मिळालेल्या स्वातंत्र्यामुळें आपोआप झाली. गुजराथेंत सामाजिक प्रगति फार त्वरेनें होत चालली आहे याला हेंच मुख्य कारण आहे.

याप्रमाणें नवआर्यावर्तांचा लोकसंग्रह, प्रगतिमान् जीवनासाठीं व संस्कारविजयाच्या प्रयाणासाठीं सिद्धता करीत होता.

संवत १९७० मध्यें एक चिरस्मरणीय प्रसंग घडला. देशी कपडे घातलेला व अनवाणी असा एक मुसाफर दक्षिण अफ्रिकेंतून येऊन मुंबईच्या बंदरांत उतरला. नवआर्यावर्तानें परसंस्काराची रक्षा फुंकून टाकिली होती. भट्टीमध्यें अग्नि प्रज्वलित झाला होता. सर्व सांस्कारिक बलांची उष्णता प्रकट झाली होती. या उष्णतेची ज्वाला उत्पन्न झाली. व ह्या नवीन प्रवाहयाच्या रूपानें ती ज्वाला दृश्यमान झाली. गुजराथ गांधींचें झालें.

गांधी ही एक व्यक्ति नसून अनेक संस्थांचा समूह आहे, भावनांचा समुच्चय आहे, सांस्कारिक व बलाचें केन्द्रस्थान आहे, ते संस्कृतिकार आहेत ते स्वतः वर्तमानकालाचे नाहींत. त्यांच्यांत भूतकालाची महत्ता व भविष्याची भव्यता आहे. आर्यावर्तानें त्यांच्या द्वारें स्वसंस्कृतीचें नुसतें संरक्षण करण्याचें बाजूस ठेवून सर्व सृष्टीला संस्काराचे पाठ देण्यास सुरुवात केली.

साहित्याचीं सर्व प्रवृत्ति त्यांनीं हस्तगत केली. साहित्यपरिषदेनें त्यांची आज्ञा ग्रहण करून शुद्धसाहित्यभक्तीला विश्रांति दिली. '**गुजराथी**' '**सरस्वतीचंद्र**' '**भागवत**' '**प्रेमानंद**' कथा, कीर्तनें या सर्वांचें स्थान '**नवजीवनानें**' घेतलें. त्यांच्याच प्रेरणेच्या जोरावर आज '**युगधर्म**' आणि '**पुरातत्व**' व इतरहि लहान मोठी पत्रें साहित्याला समृद्ध करीत आहेत.

राजकीय प्रवृत्तिहि त्यांनीं हातांत घेतली. व त्यांच्या प्रेरणेनें नुसत्या गुजराथेंतच नव्हे तर सर्व हिंदुस्थानांत स्वातंत्र्यप्रेम, राष्ट्रीय भावना आणि वीरता यांचा प्रसार झाला. या राजकीय चळवळीनें जनतेचा दृष्टिबिंदु पार बदलून टाकिला. परसत्तेनें स्वतःचें महत्व सगळीकडेस बिंबविलें होतें तें पार नष्ट झालें.

त्यांनीं संस्कृतीचा स्वतःचा जीवनमंत्र उच्चारण्याचा, स्वतःचा विकासक्रम ठरविण्याचा आणि चारहि दिशेस स्वतःचा विजयध्वज फडकविण्याचा हक्क सिद्ध केला. मातृभाषेंत बोलण्यांतच थोरवी आहे, हातानें विणलेल्या वस्त्रांतच शोभा आहे, आपलेपणा संभाळण्यांतच गौरव आहे, आणि आपल्या संस्था आपल्याच संस्कारांच्या मदतीनें सुधरूं शकतात ह्या विस्मृत सिद्धान्ताला त्यांनीं आपल्या जीवनांत स्थान दिलें.

त्यांनीं गुजराथी संस्कृतीचीं लक्षणें सगळ्या हिंदुस्थानांत फैलाविलीं. इंग्रजांच्या आगमानंतर अखिल हिंदुस्थानांत हिंदुमुसलमानांची एकतानता त्यांनींच प्रगट केली. हीरविजयसूरीनें जो परिणाम एका व्यक्तीवर केला होता तो सूरीच्या प्रतिनिधीनें सगळ्या मुसलमानांवर केला.

त्यांनीं ब्राम्हणांना--जन्मजात ब्राह्मणांना नव्हे, परंतु सेवा व त्याग सिद्ध करून

राहिलेल्या अर्वाचीन संस्कारसेवी अशा गुणकर्मांनें ब्राम्हण असलेल्यांना—शिक्षणाचा मक्ता पुनः प्राप्त करून दिला. गिरिजाशंकर बधेका व छोटालाल पुराणी सारख्या लहान, तरूण व एकाकी प्रयत्न करणारांना उत्तेजन मिळालें, व अशाच इतर प्रवृत्तीहि अमदावाद शारदापीठांत एकत्र झाल्या. परसंस्काराचें अतिप्रबल शस्त्र जें इंग्रजी शिक्षण त्याचा पादरीशाही आत्मा आतांपर्यंत निर्बल झालाच होता त्यानें या नवीन प्रवृत्तीनें देहत्याग केला.

अधम व अज्ञानी यांचा उद्धार करण्याचा व समसंस्कारितेचा प्रसार करण्याचा उत्साह सहजानंदाप्रमाणेंच गांधींजींतहि आहे. आणि त्यांच्याच प्रेरणेनें गुजरायेंत अंत्यजांचा उद्धार करण्याचे प्रयत्न सुरू झाले आहेत.

गतयुगांत परसंस्कारांना शुद्ध करण्यासाठीं ब्राम्हणांनीं ज्या प्रबल शस्त्राचा उपयोग केला तें सबल शस्त्र म्हणजे सांस्कारिक असहकार होय. गांधींनीं हें शस्त्र नव्या स्वरूपांत व नवी धार देऊन उपयोगांत आणिलें, त्यायोगें परसंस्कारांचा पुनः संचार होणें अशक्य दिसतें.

आर्यसंस्काराची दुसरीहि कित्येक महान् लक्षणें महात्मजींनीं व्यक्त केली. जे संस्कार निर्बल आहेत असें वाटत होतें तेच अत्यंत प्रबल स्वरूपांत त्यांनीं दाखविले. तप आणि अहिंसा, सत्य व संयम, क्षमा व स्वास्थ्य, या फक्त भावना आहेत अशी समजूत होऊन राहिली होती. परंतु त्यांचा प्रत्यक्ष जीवनांत संचार करून दाखविला. फक्त गुजराथी संस्कृतीच नाहीं परंतु मूल्यवान् आर्यसंस्कृति साबरमतीच्या साधूच्या रूपानें विजयी होऊन अखिल भारतवर्षांत संचार करूं लागली. तिच्या जयजयकाराचा डिंडिम प्रत्येक हिंदी मनुष्याच्या अंतःकरणांत दुमदुमूं लागला. नवआर्यावर्ताचा प्रच्छन्न अग्नि पुनः प्रज्वलित होऊन त्याची उष्णता चोहों बाजूस पसरूं लागली. नव-आर्यावर्ताला त्याचें स्वसंस्कार शुद्ध ठेविण्याचें भट्टीचें स्वरूप जाऊन अपूर्व संस्कार प्रसृत करण्याच्या यज्ञकुंडाचें स्वरूप प्राप्त झालें.

गांधीजी कारागारांत गेले आणि त्यांनीं पेरिलेल्या संस्काररूपी बीजांना जोमदार अंकुर फुटून ते चोहोंबाजूस फुलून राहिले. ते नव्या स्वरूपानें व नव्या मोहकतेनें गुजराथेस शोभा देत आहेत.

आर्यावर्ताचीं अमूल्य अंगें म्हणजे काव्यमयता, रसिकता, व प्रेमपूजा. ही यादवकालापासून गुजराथी संस्कारांचीं मुख्य अंगें होत. मीरा व नरसिंह यांनीं त्याचें पोषण करून जीवितामध्यें त्यांचें स्थान संभाळून ठेविलें. परंतु मिराबाईचा निर्मल आदर्श तिच्या मागून आलेल्या वैष्णव सांप्रदायिकांनीं थोडा मलिन केला होता. रसात्मक गुजराथी जीवनांत क्षुद्रतेचा किंचित् संचार झाला होता. दयाराम व नर्मद यांनीं अशुद्ध रूपांत त्याचा स्वीकारहि केला होता.

हें महत्त्वाचें सांस्कारिक बल शुद्ध करण्याचा प्रथम प्रयत्न संवत १९४२ मध्यें नरसिंहरावानें 'कुसुममाले'त केला व 'चक्रवाकमिथुनां'त त्या प्रयत्नाला उजाळा दिला. कलापीनें तर त्या प्रयत्नाला स्वतःचा जीवनमंत्र करून आपल्या 'केकारव' द्वारा इतरांनाहि तो जीवनमंत्र करावयास सांगितलें. नानालाल कवीनें 'नवसन्तोत्सवांत' या बलाला नवीन धार चढवून तीक्ष्ण केलें. परंतु जैन साधूंचें वजन गांधीजींवर थोडेंसें असल्यानें त्यांच्या आयुःक्रमांत या बलाला विशेष महत्त्व राहिलें नाहीं. त्यामुळें या सांस्कारिक बलाला पाहिजे तशी धार चढली नाहीं. हें बल व इतर सांस्कारिक शक्ति ज्या गांधींच्या सान्निध्यांत विकास पावूं शकल्या नाहींत त्यासुद्धां आतां स्वतःचा पराक्रम दाखवूं लागल्या आहेत.

गुजराथेनें संस्कारांचें नवें युग आरंभिलें आहे. त्याच्या संस्कृतीची महत्त्वाकांक्षा वृद्धिंगत झाली आहे व तें सामग्रीनेंहि समृद्ध झालें आहे.

त्याच्या पुरुषत्वांत त्याग आहे, उत्साह आहे, खोल व्यवहारकुशलता व उच्च अभिलाषा आहे. त्याच्यांत व्यवस्थाशक्ति आहे व स्वातंत्र्यप्रेमहि आहे. मुत्सद्दीपणा व निश्चलताहि त्यांत आहे. भावनाशीलता असून सेवाधर्माचें प्रेमहि त्यांत आहे. आणि भगीरथप्रयत्नानें मानवतेचा विकास करण्याची हौसहि त्यांत आहे.

त्याच्या स्त्रीत्वांत कुसुमाची सुकुमारता असून सतीची वज्रशीलताहि आहे. त्यांत रसिकता आहे व संरक्षकवृत्तीहि आहे. त्यांत काव्यमयता असून त्याची व्यावहारिक बुद्धि सतेज आहे. त्यांत धर्मांधता नसून श्रद्धाळु हृदयाची शक्ति आहे. त्यांत पुरुषांची बरोबरी करण्याची हौस असून पुरुषाच्या आश्रयानेंच राहण्याची इच्छा आहे. नूतन सुखोपभोगाची आकांक्षा असून दुःखें सहन करण्याचें धैर्य आहे. त्यामुळें स्त्रीपुरुषांत विशुद्ध प्रेमाची ज्योति प्रज्वलित झालेली आहे.

त्याच्या कौटुंबिक जीवनांत स्वैरता नाहीं. त्यांतील संकुचितताहि नष्ट होत चालली आहे. भूतकालाचें भान व सामाजिक व्यवस्था नामशेष होण्याइतकी शिथिल व व्यक्तिस्वातंत्र्याला हानिकारक अशी दृढ जातिबंधनें नाहींत. मानसिक वातावरण रोगी करण्यासारखीं जड व व्यावहारिक जीवनाची कुचंबणा करण्याइतकी राजस अशी त्याचीं धर्मबंधनेंहि नाहींत.

त्याचें साहस निर्बलता प्राप्त करण्याइतकें अविचारी नाहीं, आणि परदेशी सत्ता व धकाधकी यांना डरून जाईल इतकें परावलंबीहि नाहीं. गांवोगांवी नवयुगाचें चैतन्य पसरलें आहे. नवीन संस्कारांचा संचार होऊं लागला आहे. अनेक छोटालाल पुराणी, गिरिजाशंकर व गजानन पाठक या नवसंस्कृतीच्या बलाला झेलून गुजराथेच्या नवीन पिढींत त्याची प्रेरणा करीत आहेत. नानी बहेन गज्जर, सुलोचना देसाई यांच्यासारख्या अनेक भगिनी गुजराथच्या नवबालिकांचा विकास करीत आहेत. अनेक अंबालाल

पुराणी शारीरिक बलाच्या क्षेत्रांत उगवत्या मानव्याला आकर्षीत आहेत. आणि कित्येक इंदुलाल, मोहनलाल, पंड्या, चंदुलाल, दयाळजी व कुंवरजी कमी अधिक प्रमाणांत स्वातंत्र्य, शक्ति व त्याग यांचे संदेश चोहोंकडे पोहोंचवीत आहेत. अनेक अमृतलाल ठक्कर अखिल प्रजेंत समसंस्कारिता प्राप्त करीत आहेत.

अनेक पुरुषोत्तमदास ठाकोरदास, अंबालाल साराभाई विविध अडचणी असूनहि व्यापारांत गुजराथचा डंका वाजवीत आहेत. रा. आनंद शंकर, रा. खुशालशहा, रा. एरच तारापोर, रा. नगीनदास मेहेता, रा. कुंवरजी नायक, रा. कांतिलाल पंड्या हे उच्च शिक्षणाचीं विकट क्षेत्रें शोभवीत आहेत. गुजराथी मुख्य न्यायमूर्ती आणि गुजराथी ॲडव्होकेट जनरल इंग्रजी कायद्याचें क्षेत्र दिपवीत आहेत. सर चिमणलाल हे फिरोजशहा संप्रदायाचे अवशेष असून मध्यस्थ राजकीयपक्ष, मुंबई शारदापीठ आणि कायदेमंडळ यांचे नेते आहेत. महात्मा गांधी कारागारांत गेल्यामुळें राजकीय प्रवृत्तीचीं मोकळी पडलेलीं सूत्रें हातांत घेऊन उभ्या हिंदुस्थानच्या असहकारपक्षाचें भविष्य रक्षण करण्यास तत्पर असलेले वल्लभभाई पटेल गुजराथचें अग्रस्थान कायम ठेवीत आहेत.

आणि या सर्वांत अधिक अभिमानास्पद प्रवृत्ति साहित्याची होय. क्रानिकल, पारसी, सांज, हिंदुस्थान, नवजीवन, गुजराथी, युगधर्म, वसंत, समालोचक, साहित्य, पुरातत्त्व, नवचेतन आणि 'गुजराथ' चारहि दिशेस पसरलेल्या सांस्कारिक बलाचें मंथन करून त्यांतून नवनीत काढून तें सगळीकडे वाटून देत आहेत. याप्रमाणें नवसाहित्याचा आत्मा चारहि दिशेस प्रेरणा करीत आहे. भक्त नरसिंहासारखें पदलालित्य ज्यांचें आहे, 'गुणवंती गुजराथ'च्या विदेशविजयाच्या जयघोषणेप्रमाणें खबरदार गुजराथच्या आत्म्याची प्रतिमा सर्व जगतांत पसरविण्याची महत्त्वाकांक्षा बाळगणार, नवीन साहित्याच्या प्रतिनिधींचे प्रेरक आणि स्वतः वृद्ध असूनहि नवीनता संभाळून राहणार कवि **नानालाल** या 'प्रेमीजनां'च्या ऊर्मी व्यक्त करीत आहेत.

आणि गुजराथची सांस्कारिक अस्मिता–या सगळ्या प्रवृत्ति–सर्व जीवनावर अधिष्ठात्री रूपानें विराजत आहे. कळत न कळत हें सर्व एक व अविभक्त गुजराथची अंगें उपांगेंच बनलें आहेत. आणि ज्याप्रमाणें अंगोपांगाच्या एकतानतेवरून आत्म्याची परीक्षा होते त्याचप्रमाणें या गुजराथी संस्कृतीच्या प्रतापी आत्म्याची साक्ष देतात. कार्तवीर्य व परशुराम यांची ही भूमि आर्यसंस्कृतीचा विजयध्वज घेऊन उभी आहे. आणि आर्यत्वाची सनातन तत्त्वें; महत्त्वाकांक्षा व वीरता; स्वमान व स्वाश्रय; शुद्धि, स्वातंत्र्य आणि व्यवस्था; तप, शक्ति व संयम; पितृभक्ति व जीवदया; शब्दब्रह्माची सर्वांगसेवा;– हीं प्रेमनिर्मल आणि निरंकुश अशा या नव आर्यावर्ताच्या प्रेरणेनें दहाहि दिशांस पसरतील अशी आशा आहे.

---

# ज्ञानतंतु–व्यूह (Nervous System)

( लेखकः– चिं. गं. भानु )

लेखांक ३

यापूर्वी याच मासिकांत प्रसिद्ध झालेल्या दोन्ही लेखांत प्रमाणभूत म्हणून जीं जीं वचनें उद्धृत केलीं आहेत, त्यांतील 'हृदय' शब्दाचा अर्थ 'वक्षस्थलस्थ हृदय' हा नाहीं, तर मनबुद्धयादि ज्ञानसंग्राहक साधनें असणाऱ्या 'जीवात्म्याचें मस्तकांत' असलेलें स्थान तें हृदय होय, असें साधार प्रतिपादन करण्याचा मी यथाशक्ति प्रयत्न केला आहे. आजच्या प्रसंगीं ज्या कित्येक प्रमाणभूत वाक्यांचें अवतरण मीं करणार आहें, त्यांत येणारा 'नाभि' शब्द हा 'बेंबी' या अवयवाचा वाचक नाहीं; तर 'पृष्ठवंशानुसारी शरीरमध्यभाग' असाच त्याचा अर्थ त्या त्या ग्रंथकारास अभिप्रेत आहे असें दिसतें. अर्थात् या ग्रंथकारांच्या अनुसारें मीहि 'नाभि' शब्दाचा 'पृष्ठवंशस्थ शरीरमध्यभाग' असाच अर्थ धरून हा लेख लिहिला आहे. पण सद्यःकालीं प्रचलित असलेल्या हृदय व नाभि शब्दांच्या अर्थाचा जेथें उल्लेख अवश्य असेल, तेथें तेथें 'वक्षस्थलीन' हृदय व 'बेंबी' समजली जाणारी नाभि अशी शब्दयोजना करण्याचें मीं ठरविलें आहे. तसेंच उपनिषदें व योगग्रंथप्रभृति वाङ्मयांत येणारा 'नाडी' शब्द हा ज्ञानतंतू (मज्जातंतू) ह्या शारीरिक अवयवाचा वाचक आहे, असें सर्वत्र समजावें.

दशोपनिषदांत 'हृदय' या शब्दाचा अवतार अजमासें ४०।५० वेळ झाला आहे. 'नाडी-' हा शब्द या उपनिषदांमध्यें मला सुमारें १५ वेळ आढळला. पण 'नाभि' शब्दाचा उल्लेख चार पांच ठिकाणीं मात्र आलेला दिसतो. नाड्या ह्या हृदयाशीं संबद्ध आहेत असें, अथवा नाड्या हृदयापासून निघतात, अशा प्रकारचें वर्णन दशोपनिषदांत अनेक वेळां आलेलें आहे; पण नाड्या या नाभीशीं संबद्ध आहेत अगर त्या नाभिकंदापासून निघतात असें वर्णन मला दशोपनिषदांत कोठेंहि आढळलें नाहीं. पण दशोपनिषदांव्यतिरिक्त योगविषयक जीं 'उपनिषदें' व योगग्रंथ आहेत, त्यांत मात्र या शारीरिक नाड्यांचा संबंध 'नाभि या अवयवाशीं सांगितलेला आढळतो. पण हे योगशास्त्रावर ग्रंथ लिहिणारे पंडित "नाड्यांची उत्पत्ति हृदयापासून आहे, अथवा त्या सर्व नाड्यांचा संबंध हृदयाशीं आहे" असें सांगतांना मला कोठेंहि दिसले नाहींत.

दशोपनिषदांतील 'नाभि'शब्दयुक्त वचनें

१ नाभिः निरभिद्यत । नाभ्यः अपानः; अपानात् मृत्युः ॥ ऐतरेय (१।४)

१ नाभिः प्राणनिबंधनस्थानम् । शांकरभाष्य.

३ मृत्युः अपानो भूत्वा नाभिं प्राविशत् । ऐतरेय (२।४)

४ अराः इव रथनाभौ संहताः यत्र नाड्यः । मुंडक (२।२।४)

५ पूर्वं देवेभ्यः अमृतस्य ना३भायि । तैत्तिरीय (३।१०।६)

या उद्धृत केलेल्या पांच वाक्यांपैकीं तीन वाक्यांतच 'नाभि' हा शब्द शरीरावयववाचकें आहे, हें कोणालाहि न सांगतां समजण्यासारखें आहे. त्यांतसुद्धां शरीराचा अवयव असणाऱ्या नाभीचे ठिकाणीं प्राण, अपान, व्यान, उदान, समान, हे पंचप्राण निगडीत झालेले आहेत, असें वर्णन पूर्णतः दुसऱ्या व अंशतः तिसऱ्या वाक्यांत मात्र आलें आहे; तें तज्ज्ञ वाचकांनीं विसरूं नये. पहा कीं प्राणापानादिकर्में करणारा जो वात, त्याचें राहण्याचें ठिकाण पृष्ठवंशस्थ ज्ञानतंतू हेच होत हें सर्वविदित आहे. तसेंच, बेंबीच्या ठिकाणीं प्राणादिकांचें निबंधन करणारी कांहीं वस्तुच नाहीं, हा प्रत्यक्षाचा अनुभव आहे. म्हणून मी आग्रहानें सुचवितों कीं, या वाक्यांतील 'नाभि' शब्दाचा अर्थ 'पृष्ठवंशस्थ मज्जातंतूच' असणें वाजवी आहे.

चवथ्या उताऱ्यांतील 'नाभि' शब्द उपमासाधक आहे. चाकाच्या तुंब्याभोंवतीं आरे लागलेले असतात, तद्वत् हृदयाचे ठिकाणीं नाड्या एकत्र होतात, हा या वाक्याचा तात्पर्यार्थ आहे.

पांचव्या वाक्यांत ब्रह्मरूपी जीव अमृताचा सांठा (नाभि) आहे, असें वर्णन आहे.

या उताऱ्यांवरून स्पष्ट होतें कीं शारीरिक नाड्या नाभीशीं संलग्न आहेत वा त्या नाभीपासून निघतात, असें सांगण्याचा दशोपनिषदांचा अभिप्रायच नाहीं. मात्र तद्व्यतिरिक्त इतर उपनिषदांत ठिकठिकाणीं वर्णन आढळतें कीं शरीरावयववाचक नाभीशीं शारीरिक नाड्या संलग्न आहेत. तसेंच, त्या नाड्या नाभि, नाभिकंद, नाभिचक्र, नाडीचक्र यापासून निघतात असेंहि वर्णन आढळतें. हें खरें; परंतु मला वाटतें ह्या सर्व स्थळीं नाभि शब्दाचा 'बेंबी' हा अर्थ करणें अन्याय्य व असमंजस आहे. कारण, बेंबी या अवयवापासून कोणत्याहि नाड्या (Nerves) निघत नाहींत व कोणतेहि ज्ञानतंतू (Nerves) बेंबीशीं संबद्ध असलेले प्रत्यक्षांत दृष्टोत्पत्तीस येत नाहींत.

यापुढील * उताऱ्यांत नाभि शब्दाऐवजीं 'नाभिचक्र, नाभिकंद, नाडीचक्र वगैरे वगैरे सामासिक शब्द येतात, असें दिसेल.

नाभिचक्रे कायव्यूहज्ञानम् ।— पातंजल योगसूत्र, पाद ३ सूत्र २८

वृत्तिः—शरीरमध्यवर्ति नाभिकंदरूपं कदलीकंदवत् आदौ उत्पद्यते । यतः शाखापल्लवादिवत् शिरःपादादिकं अवयवजातं उर्ध्वमधश्च आविर्भवति । तत्र नाभिचक्रे संयमेन साक्षात्कारपर्यंतेन कायस्थ–पदार्थ–वात–पित्त–त्वगसृगादिव्यूहं जानीयात् ।

सूत्राचा अर्थः—नाभिचक्राचे ठिकाणीं मनाची धारणा केली असतां सर्व शारीरिक अवयव व त्या त्या अवयवाची रचना, यांचें ज्ञान होतें.

वृत्त्यर्थः—शरीर–मध्य–भागाच्या ठिकाणीं कर्दळीच्या कांद्याप्रमाणें प्रथमतः नाभिकंदसंज्ञक एक अवयव उत्पन्न होतो. ह्या कंदापासून वरील भागीं मस्तक वगैरे व खालील भागीं पाय वगैरे शाखा उत्पन्न होतात. या स्वरूपाच्या नाभिचक्राच्या ठिकाणीं, साक्षात्कार होईपर्यंत, चित्त नियमन करून तें स्थिर केलें असतां शरीरांतील वात, पित्त, त्वचा, रक्त इत्यादि समूहाचें ज्ञान होतें.

* या उताऱ्यांतील नाभि म्हणजे पोटाच्या वरच्या भागीं दृष्टोत्पत्तींत येणारी बेंबी नव्हे.

स्पष्टीकरणः—वरील सूत्रांत ' नाभिचक्र ' असा शब्द आहे, त्याचा वृत्तींत 'नाभिकंद' असा स्पष्ट अर्थ केला आहे. आणि या कंदापासूनच डोकें, हात, पाय इत्यादि अवयव प्रादुर्भूत होतात, असें म्हटलें आहे. रताळें, गोराडू वगैरे कित्येक कंद लांबोडे असतात, त्याप्रमाणेंच हा नाभिकंद ( सूत्रांतील नाभिचक्र ) लांबोडा असून त्याच्या वरील भागीं डोकें, हात व खालील भागीं पाय आहेत, असें म्हटलें आहे. यावरून हें मला स्पष्ट दिसतें कीं, हा नाभिकंद म्हणजे बेंबी नसून शरीरमध्यवर्तीपृष्ठवंशांत असणारा अवयव होय. सुसंगत अर्थ असाच होतो व व्हावा. बेंबी नसण्याचें कारण हें कीं पोटांत असणाऱ्या बेंबीच्या ठिकाणीं नाड्यांचें चक्र मुदलांतच नाहीं. पुनः या नाभिसंज्ञक पृष्ठवंशगत रज्जूकडे पाहिल्यास दिसतें कीं येथेंच सर्व नाड्या ( Nerves ) लागलेल्या असल्यामुळें नाभिचक्र, नाडीचक्र, नाभिकंद या सर्व एकार्थक संज्ञा सार्थ होतात.

या कंदासंबंधानें ' हठयोगप्रदीपिका ' काय म्हणते पहाः—

उर्ध्वं वितस्तिमात्रं तु विस्तारं चतुरंगुलं ।
मृदुलं धवलं प्रोक्तं वेष्टितांबरलक्षणं ॥
कंदं प्रपीडयेत् तत्र

टीकाः—मूलस्थानात् वितस्तिमात्रं ऊर्ध्वं उपरि नाभिमेंढ्रयोर्मध्ये कंदं प्रपीडयेत्।

स्पष्टीकरणः—पाठीच्या कण्याच्या शेवटच्या भागापासून एक वीतभर वरचे भागीं नाभि प्रदेशामध्यें असणारा, चार बोटें लांबीचा, मऊ, रंगानें पांढरा, आणि अंगावर पातळ आवरण असलेला ' नाभिकंद आहे. ' वज्रासन घालून त्या कंदावर पायाच्या टाचेनें दाब दिला असतां कुंडलिनी जागृत होते.

योगशास्त्राच्या ग्रंथांत वर्णिलेल्या या स्वरूपाचा नाभिकंदापासूनच सर्व शारीरिक नाड्यांचा उद्भव आहे असें खालील वाक्य स्पष्ट सांगतेंः—

उर्ध्वं मेंढ्रादधो नाभेः कंदयोनिः खगांडवत्।
तत्र नाड्यः समुत्पन्नाः सहस्राणां द्विसप्ततिः ॥

गोरक्षशतक

आणखीः—पंच ज्ञानेंद्रियांस व पंच कर्मेंद्रियांस ज्ञान व चेतना अनुक्रमें देणाऱ्या नाड्या नाभिकंदापासून निघतात, असें वर्णन दशोपनिषदेतर इतर अनेक उपनिषदांत दृष्टोत्पतीस येतें. उदाहरणार्थः—

कंदमध्ये स्थिता नाडी सुषुम्नेति प्रकीर्तिता ॥
तिष्ठंति परितस्तस्याः नाड्यो हि मुनिपुंगव ॥
द्विसप्ततिसहस्राणि तासां मुख्याश्चतुर्दश ॥

अर्थ स्पष्टच आहे. खालपासून वर मस्तकापर्यंत जाणारी कंदस्थ सुषुम्ना नांवाची नाडी आहे व तिच्या सभोंवार ७२००० नाड्या वास्तव्य करून सर्व शरीरभर पसरल्या आहेत. त्यांतील १४ नाड्या मुख्य आहेत.

इडा च पिंगला चैव तस्याः पार्श्वद्वये गते । विलंबिन्यामनुस्यूते नासिकांतमुपागते । विलंबिनी तु या नाडी व्यक्ता नाभौ प्रतिष्ठिता । तत्र नाड्यः समुत्पन्नाः... । तन्नाभिचक्रमित्युक्तं कुक्कुटांडमिव स्थितं । गांधारी हस्तिजिव्हा च तस्मिन्नेत्रद्वयं गते । पूषा चालंबुषा चैव श्रोत्रद्वय उपागते । ' सुरानाम ' महानाडी तस्माद्भ्रूमध्यमाश्रिता ॥ ' विश्वोदरा ' तु या नाडी सा भुंक्तेऽन्नं चतुर्विधं । ' सरस्वती ' तु या नाडी जिव्हांतं सा प्रसर्पति ॥ 'राकाह्वा...'॥ कंठकूपोद्भवा नाडी ' शंखिन्याख्या ' त्वधोमुखी । अन्नसारं समादाय मूर्ध्नि संचिनुते सदा । नाभेरधोगतास्तिस्रो नाड्यः स्युश्चाप्यधोमुखाः । मलं त्यजेत्कुहूर्नाडी मूत्रं मुंचति वारुणी । चित्राख्या सीवनी नाडी शुक्रमोचनकारिणी । नाडीचक्रं इति प्रोक्तं... । योगशिखोपनिषत् अ. ५

वर सांगितलेल्या सुषुम्नेच्या दोन्ही बाजूंस इडा व पिंगला ह्या नाड्या नाकापर्यंत तिच्यामागें अनुस्यूत होऊन गेल्या आहेत. खालीं लोंबणारी म्हणून सुषुम्नेलाच ' विलंबिनी ' म्हणतात. ती चारी प्रकारचें अन्न भोगणारी नाभिचक्रांत प्रतिष्ठित झाली आहे. आणि तिच्या पासूनच सर्व खालच्या, वरच्या, व आजूबाजूच्या नाड्यांची उत्पत्ति आहे. तें चक्र कोंबड्याच्या अंड्याप्रमाणें आहे. तेथून ' गांधारी ' व 'हस्तिजिव्हा' या दोन नाड्या नेत्रद्वयाकडे, ' पूषा व अलंबुषा ' कर्णद्वयाकडे, ' सुरा ' भ्रूमध्याचे ठिकाणीं जाणारी ' विश्वोदरा ' नाडी, जिव्हेच्या टोकापर्यंत जाणारी ' सरस्वती व राका ' या उर्ध्वगामी नाड्या आहेत. मध्यभागीं शंखिनी अधोमुख असून खाल्लेलें अन्न पचविते आणि अन्नाचा ' अणिष्ठ ' रस मस्तकांतील मेंदूंत सांठविते. नाभीच्या खालीं तीन अधोमुख नाड्या आहेत, त्या कुहू, वारुणी व चित्रा या होत. मल टाकून देणारी कुहू, मूत्र फेकणारी वारुणी आणि शुक्रमोक्ष करणारी चित्रा, असें यांचें कार्यविभाजन आहे. हेंच नाडीचक्र होय.

स्पष्टीकरणः—प्रत्यक्ष वस्तुस्थिति काय आहे, तिचा विचार करतां हें निःसंशय ठरतें कीं नाभिकंद म्हणजे पोटावर वसलेली बेंबी अथवा तिच्या आंतील भागीं पृष्ठवंशास लागून असणारा कंद म्हणजे नाभिकंद नव्हे. कारण जिव्हा डोळे व कान यांकडे जाणाऱ्या नाड्या पृष्ठवंशगत मज्जारज्जूपासून अथवा सुषुम्ना नाडीच्या ऊर्ध्वभागापासून निघतात. तसेंच, शुक्र, मूत्र, पुरीषरूपी मळ बाहेर टाकण्याची चेतना उत्पन्न करणाऱ्या नाड्या कमरेच्या खालच्या भागांतून निघतात, हें प्रत्यक्ष आहे. अर्थात् वर उल्लेखिलेल्या १४ नाड्या पृष्ठवंशरज्जूच्या ज्या व जेवढ्या भागांतून निघतात, त्याला व तेवढ्या भागास नाभि, नाभिचक्र किंवा नाडीचक्र या संज्ञा अन्वर्थक होत, असें म्हणणेंच आवश्यक व रास्त आहे. प्रत्यक्षाशीं हेंच म्हणणें जुळतें. बेंबीच्या ठिकाणीं कोणतीहि नाडी नाहीं, कोणत्याहि प्रकारची वाहिनीहि पण नाहीं.

सर्व नाड्या ह्या नाभि, नाभिकंद, नाभिचक्र ह्यापासून निघतात, असे उल्लेख दशोपनिषदेतर जीं जाबाल, वाराह, त्रिशिखियोगचूडामणी, नाड्युत्पत्ति, योगशिखोपनिषत्, रुद्रयामल इत्यादि इत्यादि यौगिक, उपनिषदांतून सुमारें २५।३० वेळ आलेले आहेत. ते सर्व एकार्थकच आहेत तेव्हां त्याच त्याच गोष्टीची पुनरुक्ति करण्यांत तात्पर्य मुळींच नाहीं, असें समजून त्या उपनिषदांतील वचनें मीं येथें दिलीं नाहींत.

आम्ही आतांपर्यंत हृदय, नाड्या व नाभि एतत्संबंधीं दशोपनिषदांतील जीं जीं अवतरणें उद्धृत केलीं, त्यांत नाड्यांचा संबंध अव्याहतपणें हृदयाशींच सांगितलेला आढळला. तसेंच त्यानंतर दशोपनिषदांव्यतिरिक्त अनेक उपनिषदांतून यासंबंधीं जीं वाक्यें सांपडतात, त्यांमध्यें शारीरिक नाड्यांचा संबंध प्रामुख्यानें नाभिकंद, नाभिचक्र इत्यादिकांशीं सांगितलेला आढळला. व षट्चक्रनिरूपण, शिवसंहिता वगैरेसारख्या ग्रंथांतील जीं अवतरणें पुढें उद्धृत केलेलीं आहेत, त्यांत तर हा नाड्यांचा संबंध पृष्ठवंश, मेरुदंड या भागाशीं आहे असें स्पष्ट सांगितलें आहे. म्हणजे दशोपनिषदांपासून षट्चक्रनिरूपणापर्यंत जे अनेक यौगिक ग्रंथ झाले त्यांमध्यें नाड्यांच्या मूळ स्थानाच्या निर्देशासंबंधीं प्रथम हृदय, नंतर नाभि व त्यानंतर पृष्ठवंश किंवा मेरुदंड अशीं तीन परिवर्तनें झालेलीं आढळून येतात. यौगिक नाड्या म्हणजे शरीरांतील ज्ञानतंतू होत व ह्या नाड्यांचें मूलस्थान डोक्यांतील मेंदू (शिरोंतर्गत हृदय) व त्याच्या अधोभागीं असणारा पृष्ठवंशरज्जु (नाभि) हे होत असें आपणास प्रत्यक्षावरून समजून येतें. असें असतां हीं जीं मूलस्थानाची परिवर्तनें घडून आलीं याविषयीं असें अनुमान करावें लागतें कीं—जीवात्मा, मनबुद्ध्यादिक अंतःकरणचतुष्टय, ज्ञानेंद्रियें, त्यांचे अर्थ व ज्ञानविज्ञानादि हीं सर्व मेंदूच्या ज्या भागांत राहतात त्या स्थानास दशोपनिषत्कालीं हृदय म्हणण्याचा परिपाठ होता व म्हणूनच हृदयापासून नाड्या निघतात हें त्यांचें म्हणणें यथार्थ मानिलें जात असे. दशोपनिषत्कालानंतर उत्तरोत्तर हृदय शब्दाचा (शिरोंतर्गत हृदय) हा अर्थ लुप्तप्राय झाला व प्रचारांत हृदय शब्दानें फक्त वक्षःस्थलीन हृदयाचाच बोध व्हावयास लागला, व म्हणून योगवासिष्ठासारख्या ग्रंथांतून

" साधो जगति भूतानां हृदयं द्विविधं स्मृतम् ॥
इयत्तया परिच्छिन्ने देहे यद्वक्षसोंतरम्। हेयं तत्हृदयं विद्धि "

यासारख्या सूचना देण्यांत आल्या. हृदय शब्दाचा (शिरोंतर्गत हृदय) हा अर्थ लुप्त झाल्यानें पुढील ग्रंथकारांनीं नाड्यांची उत्पत्ति हृदयापासून न सांगतां ती नाभिपासून होते, अशा प्रकारच्या वर्णनास सुरवात केली. परंतु संस्कृत भाषेंत नाभि शब्दाचा अर्थ वेंबी हाहि एक अर्थ असल्यानें व संस्कृत भाषेच्या न्हासकालांत उत्तरोत्तर तोच प्रधान होऊन बसल्याकारणानें षट्चक्रनिरूपणकारांनीं नाभि शब्दाच्या ऐवजीं पृष्ठवंश, मेरुदंड, मुंडाधारदंड वगैरे शब्द वापरले. षट्चक्रनिरूपणासारख्या ग्रंथांतून सुषुम्नादि नाड्यांचा संबंध मेरुदंड, मुंडाधारदंड (पाठीचा कणा) याशीं असलेला स्पष्ट शब्दांनीं सांगितलेला आहे म्हणून यापुढें त्यांतील दोन तीन अवतरणें देत आहोंत.

मेरोर्बाह्यप्रदेशे शशिमिहिरशिरे सव्यदक्षे निषण्णे
मध्ये नाडी सुषुम्ना त्रितयगुणमयी चंद्रसूर्याग्निरूपा
धूस्तूरस्मेरपुष्पग्रथिततमवपुः कंदमध्यात् शिरस्था
वज्राख्या मेंढ्देशाच्छिरसि परिगता मध्यमे स्याज्ज्वलंती॥
तन्मध्ये चित्रिणी सा प्रणवविलसिता योगिनां योगगम्या
लूतातंतूपमेया सकलसरसिजान्... षट्चक्रनिरूपण.

श्लोकाचें तात्पर्य हें:—पाठीचा कणा म्हणजे मेरुदंड (मुंडाधारदंड) होय. पृष्ठवंशाच्या मणक्यांमधील छिद्रांच्या योगें एक पोकळी पृष्ठवंशांत तयार व्हावी, अशाच योजनेनें मणक्यांची मांडणी केली आहे. माकडहाड तें डोक्याच्या कवटीपर्यंत सुषुम्ना नामक नाडी पसरली असून वंशाच्या बाहेर अरुणा(?) सुषुम्नेच्या जातीच्या इडा व पिंगळा नामक शिरा उजवे डावे बाजूस आहेत. सुषुम्नेचा आकार धोतऱ्याच्या फुलासारखा आहे. सुषुम्नेचा वर्ण पांढरा आहे. तिचा वरचा भाग अमृत स्रवणारी गांठ असून ती जाड आहे. त्या सुषुम्नेस लागून असणारीं (तिच्या आश्रयास असणारीं) जीं सहा चक्रें आहेत, त्या सर्वांस चालना देणारी हीच नाडी होय. सुषुम्नेच्या वरच्या अमृतस्रावी ग्रंथीला मुख म्हणतात.

तिसृष्वेका सुषुम्नेव मुख्या सा योगवल्लभा। अन्यास्तदाश्रयं कृत्वा नाड्यः संति हि देहिनाम्।

सर्वाश्चाधोमुखा नाड्यः पद्मतंतुनिभाः स्थिताः। पृष्ठवंशं समाश्रित्य... ॥ शिवसंहिता

सुषुम्नेच्या आश्रयाला सर्व शरीरस्थ अधोमुख नाड्या कमलतंतूसारख्या असून त्या पृष्ठ-वंशाला धरून असतात.

**यौगिक नाड्यांचें मनुष्यदेहांतील कार्यः—**

देहेऽस्मिन्देहनाडीषु वातः स्फुरति योऽभितः
स्पंदेष्विव भुवो वारि स प्राण इति कीर्तितः
उपशमप्रकरण सर्ग ७८।१० योगवासिष्ठ

नाडीरंध्रेषु सर्वेषु संचरन् प्राणमारुतः
दोषैरयुक्तः सुखकृत् दोषयुक्तो गदावहः। नाडीविज्ञान.
प्राणाद्याः पंचविख्याताः नागाद्याः पंच वायवः
एते नाडीसहस्रेषु वर्तंते जीवरूपिणः। ध्यानबिंदु ५७; जाबालदर्शन २४
प्रदक्षिणक्रमेणैव चक्रस्यारेषु नाडयः
वर्तंते द्वादश ह्येता द्वादशानिलवाहकाः ॥ वाराह २८

ह्या अनेक अवतरणांवरून स्पष्ट होतें कीं, नाड्यांतून केवळ प्राणापानात्मक शारीरिक वात वाहत असतो आणि या नाड्यांमधून रक्तासारखा कोणताहि पदार्थ वाहत नाहीं.

आतां कोठें कोठें ह्या नाड्यांतून रस वाहतो असे उल्लेख आलेले आढळतात व हीच गोष्ट आधाराला घेऊन कित्येक लोक आग्रहानें म्हणतात कीं 'नाड्या' ह्या ज्ञानवाहक तंतु (Nerves) नसून त्या रक्तासारख्या द्रव पदार्थांच्या वाहक आहेत असा अर्थ यौगिक ग्रंथकारांस इष्ट आहे. परंतु हा भ्रम खालीं उद्धृत केलेल्या शांकरभाष्यांतील उताऱ्या-वरून नाहींसा होईल. पहाः—

अन्नं हि भुक्तं त्रेधा परिणमते। यः स्थूलः परिणामः...। यो मध्यमो रसः स लोहितादि-क्रमेण स्वकार्यं शरीरं साप्तधातुकं उपचिनोति।....यस्तु अणिष्ठो रसः 'अमृतं ऊर्क्प्रभावश्च' इति कथ्यते स नाभेः ऊर्ध्वं हृदयदेशे आगत्य हृदयाद्विप्रसृतेषु नाडीसहस्रेषु अनुप्रविश्य यत् तत्करणसंघातरूपं लिंगं शिशुसंज्ञकं तस्य शरीरे स्थितिकारणं भवति। बृह० २।२।१ शां. भा.

ह्या अवतरणांत शरीरांतील रसरक्तादि सप्त धातु वेगळे आणि अमृतरूपी ऊर्ध्वप्रभाव ( विलक्षण शक्तीचा ) अणिष्ठ रस वेगळा असा स्पष्ट विशेष सांगितला आहे. तसेंच नाड्यांतून रक्तादि धातु वाहत नसून अणिष्ठ रसच तेथें प्रवेश करून असतो; तसेंच हा रस नाभीच्या ऊर्ध्वभागीं पृष्ठवंशगत रज्जू = spinal chordच्या वर असणाऱ्या मस्तिष्कांतर्गत हृद्यांत येऊन तेथून निघणाऱ्या ७२००० नाड्यांत प्रवेश करतो, असेंहि सांगितलें आहे. व हा रसच मनबुद्धिप्रभृतींचा जनक होय, असें मला वाटतें.

## सारांश.

मोठ्या संतोषाची गोष्ट आहे कीं दशोपनिषत्कालीं 'हृदय' ही संज्ञा मस्तकांतील एका विशिष्ट भागास सरसहा लावीत आणि त्या भागाच्याच खालीं असणाऱ्या पृष्ठवंशरज्जूला 'नाभि' या संज्ञेनें ओळखत असत. तेव्हां हृदयापासून निघणाऱ्या व नाभीशीं संबद्ध असणाऱ्या नाड्या म्हणजे ज्ञानतंतू ( nerves ) ह्या बाह्य वस्तूंचे संस्कार मस्तकापर्यंत नेऊन ज्ञान उत्पन्न करतात, व आंतील इच्छाप्रेरित हुकूम बाहेर पोहोंचवितात; हा अनुभव ऋषींस शारीरिक प्रत्यक्षानें येई. अर्थात् त्या ऋषींनीं ज्यांस नाड्या म्हटलें, त्या आधुनिक nerves म्हणजे ज्ञानतंतू होत. परंतु कांहीं कारणांमुळें हृदयशब्दाचा पूर्वनिश्चित अर्थ कालांतराच्या ओघामुळें लुप्त झाला आणि हृदय म्हणजे वक्षसांतर्गत अवयव अशी समजूत झाली आणि हर्षखेदसमयीं धडधडणाऱ्या या अवयवाच्या अनुभवानें ती दृढ झाली व पटली. पण यामुळें 'हृदयापासून नाड्या निघतात, एकत्र होतात' हें प्रत्यक्षानें सिद्ध होईना. तेव्हां ही अडचण यौगिक परंपरेंतील ग्रंथकारांनीं अंशतः दूर केली. ती अशी–त्यांनीं नाड्यांचें उगमस्थान म्हणजे नाभि, नाभिकंद, नाभिचक्र, किंवा नाडीचक्र होय, असें त्यांनीं ठरविलें. हेंहि कांहीं वावगें नव्हतें. कारण पृष्ठवंशस्थरज्जूलाच ते नाभिचक्र म्हणत, अथवा कोणी नाभि, कोणी कंद, तर कोणी चक्र असेंहि म्हणत. नाभि म्हणजे 'बेंबी' हें कोणत्याहि शास्त्रज्ञग्रंथकाराच्या ध्यानीं मनींहि नव्हतें. परंतु भवितव्यता बलीयसी! व्यवहारांतून संस्कृत भाषेचें उच्चाटन, शारीरिक प्रत्यक्षाच्या ज्ञानाचा अभाव, इत्यादि कारणांचा जोर झाला आणि नाभि म्हणजे केवळ बेंबीच असें सर्वतोमुखी झालें! आणि म्हणूनच पुढील ग्रंथकारांनीं 'मेरुदंड, मुंडाधारदंड' वगैरे शब्दांनीं, सदहू अवयवांचा स्पष्ट निर्देश केला !! म्हणून विनंति ही कीं दशोपनिषदादि प्राचीन ग्रंथ व तत्समकालीन इतर शास्त्रीय ग्रंथ हे वाचतांना 'हृदय' म्हणजे केवळ वक्षसांतर्गत अवयव नव्हे, नाभि म्हणजे केवळ बेंबी नव्हे हें लक्षांत ठेवावें. ही सूचना अमलांत आल्यास नाना प्रकारच्या असत्कल्पना व त्यांचें विजृंभण हीं स्तब्ध होतील आणि ऋषिकृत विधानें प्रत्यक्षाशीं सुसंगतच आहेत, ही गोष्ट प्रतीतींत येऊन पटण्याला यत्किंचितहि उशीर लागणार नाहीं.

यानंतर ज्ञानतंतु, हृदय व नाभि यांविषयीं 'आयुर्वेदाचें' काय म्हणणें आहे, याचा विचार करावयाचा.

---

# अभिप्राय

**साधनचिकित्सा**—( लेखक वा. सी. बेंद्रे ). भा. इ. सं. मंडळाच्या पुरस्कृत ग्रंथमालेंतील या ७ व्या ग्रंथांत शिवशाहीच्या साधनग्रंथांची चिकित्सा केलेली आहे. इतिहास हा वाङ्मयाचा एक प्रकार असून ऐतिहासिक ग्रंथाकडे नीतिबोधाच्या, मनोरंजनाच्या किंवा राजकारणाच्या दृष्टीनें पाहण्याचा प्रघात पूर्वी होता व त्यामुळें लेखकाचें मुख्य लक्ष मजकूर सजवून मांडण्याकडे लागलेले असे. भारत, रामायण वगैरे आर्यांचे प्राचीन ग्रंथ असोत किंवा मेकॉले, ग्रोट सारखे पाश्चात्य लेखकांचे इतिहास असोत त्यांत सत्यमेव जयते, भक्तिमाहात्म्य वगैरे तत्त्वाचा धागा गोवलेला असे अगर भाषासौंदर्य साधण्याचा व लेखन चित्ताकर्षक करण्याचा अटोकाट प्रयत्न केलेला असे. किंबहुना इतिहासावरचा नामांकित ग्रंथ म्हणजे उत्तम भाषापद्धतीचा नमुना असे यामुळें इतिहासकाराचा मुख्य गुण म्हणजे लेखनकौशल्य असें मानण्यांत येई. पण गेल्या ५० वर्षांत हा मनु पालटला आहे. भाषेच्या सजावटीचें महत्त्व इतिहासांत तादृश नसून ऐतिहासिक परिस्थितीची यथार्थ कल्पना समजून घेण्यासाठीं पद्धतशीर प्रयत्न करणें हें इतिहास लेखकाचें आद्य कर्तव्य आहे; व अशा प्रयत्नांत चिकित्सक पद्धति स्वीकारणें अत्यवश्यक आहे, हीं तत्वें अलीकडे सर्वमान्य झालीं आहेत. यामुळें या चिकित्सक पद्धतीची रूपरेषा लोकांपुढें असणें जरूर आहे. या पद्धतीचें शास्त्रशुद्ध विवेचन करणारे ग्रंथ इंग्रजींत आहेत. पण त्यांचें भाषांतर करून महाराष्ट्राच्या इतिहास रचनेस विशेष मदत होण्याजोगी नाहीं; कारण युरोपियन व महाराष्ट्रीय इतिहासांच्या साधनस्वरूपांत फार तफावत आहे. यामुळें या विषयावर स्वतंत्ररीतीनें पुस्तक लिहिणें आवश्यक होतें व हें काम रा. बेंद्रे यांनीं या ग्रंथांत करण्याचा प्रयत्न केला आहे. संशोधकी, गोष्टीरूप आणि ध्येयवादी असे इतिहासाचे तीन विभाग पाडून शिवकालीन इतिहासाचीं साधनें कोणकोणत्या भाषेंत, कोणत्या स्थितींत व कोणकोणत्या प्रकारचीं आढळतात याची माहिती या ग्रंथांत दिली आहे. त्याचप्रमाणें या साधनांची छाननी कशी करावी व त्यांतील विधानें ग्राह्य किंवा अग्राह्य ठरवितांना कोणती काळजी घ्यावी या विषयींच्या सूचनाहि यांत दिल्या आहेत. एकंदरींत मराठींत या विषयावर ग्रंथच नव्हता तो आतां अस्तित्वांत आला ही आनंदाची गोष्ट आहे; पण त्याबरोबरच या ग्रंथाची मांडणी सुबोध रीतीनें व विषयवारीनें भाग पाडून केली असती तर वाचकांची अधिक सोय झाली असती हें सुचविणें भाग आहे. यांत उपयुक्त माहिती पुष्कळ खेचून भरलेली आहे, व भाषा कांहीं ठिकाणीं बोजड आहे. हीच माहिती क्रमानें व सुबोध भाषेंत मांडल्यास या ग्रंथाची उपयुक्तता किती तरी वाढवितां येईल. तथापि आहे या स्थितींत देखील ग्रंथ संग्राह्य व वाचनीय आहे आणि आम्ही दाखविलेले दोष पुढील आवृत्तींत काढून टाकण्याच्या दृष्टीनें दाखविले आहेत.

# मराठी व्याकरणांतील संज्ञांसंबंधानें कांहीं विचार.

( लेखकः–श्रीनिवास नारायण बनहट्टी )

आपल्या भाषेच्या व्याकरणाकडे आमच्यांतील विद्वानांचें पूर्वीपासून एकंदरीनें चांगलेंच लक्ष लागलेलें आहे. मराठी व्याकरणाचा समग्र आणि व्यापक विचार करणारे व्याकरणकार आजपर्यंत निदान पांच सहा तरी झाले आहेत. दादोबा पांडुरंग, कृष्णशास्त्री चिपळूणकर, कृष्णशास्त्री गोडबोले, रामचंद्र भिकाजी जोशी, विश्वनाथ काशिनाथ राजवाडे, मोरो केशव दामले, हीं स्वतंत्र व्याकरणकारांचीं नांवें मराठी भाषेच्या इतिहासांत चिरकाळ टिकून राहतील यांत संशय नाहीं. शालोपयोगी व्याकरणें रचणाऱ्या लेखकांची संख्या उपर्युक्त व्याकरणप्रणेत्यांच्या संख्येपेक्षां पुष्कळ पटींनीं अधिक असेल. यांशिवाय व्याकरणांतील महत्त्वाच्या प्रश्नांवर फुटकळ लेख लिहिणारे प्रबंधकार तर किती तरी झाले आहेत ! असें असूनहि, किंबहुना असें आहे म्हणूनच आमच्या व्याकरणाला अजून शिस्त व एकरूपता मुळींच आलेली नाहीं. व्याकरणांतील निरनिराळ्या तत्त्वांचे पुरस्कर्ते किंवा परस्पर भिन्न पद्धतींचे अभिमानी असे जे कृष्णशास्त्री, राजवाडे, दामले, जोशी, इ० स्वतंत्र व्याकरणकार, ते सर्व आतां दिवंगत झाले आहेत. तेव्हां आतांपर्यंत सर्व व्याकरणकारांनीं व प्रबंधकारांनीं प्रकट केलेल्या विचारांचें मंथन करून व भाषेचें एकसारखें होत असलेलें विकसन लक्षांत घेऊन एक नवीन, सर्वांगपरिपूर्ण असें व्याकरण बनविणें जरूरीचें झालें आहे. आपल्या भाषेची लेखनपद्धति निश्चित करण्यासाठीं महाराष्ट्र-साहित्य-संमेलनानें ज्याप्रमाणें एक कमिटी नेमली आहे, तशाच तऱ्हेचा कांहीं तरी उपक्रम व्याकरणाच्या बाबतींत केल्यास व्याकरणाची एक सर्वमान्य व ठरीव पद्धति अमलांत येणें पुष्कळ सुकर होईल. एका कोणातरी अधिकारी व उत्साही विद्वानाकडे व्याकरण रचण्याचें काम संमेलनानें सर्वानुमतें ठराव करून द्यावें. त्यानें केलेल्या कामावर देखरेख करून त्यांत सुधारणा वगैरे सुचविण्याकरितां सर्वमान्य, वृद्ध व भाषाशास्त्रज्ञ अशा पांचसहा गृहस्थांचें निरीक्षक मंडळ नेमावें. अशा रीतीनें निरीक्षक मंडळाच्या देखरेखीखालीं नियोजित केलेलें व्याकरण साहित्यसंमेलनानें मान्य करावें व साहित्यपरिषदेनें त्याचा पुरस्कार करून तें परिषदेचें व संमेलनाचें अधिकृत व्याकरण म्हणून प्रसिद्ध करावें; आणि मध्यप्रांतांत व मुंबई इलाख्यांत सरकारच्या शिक्षणखात्यांमध्यें खटपट करून सरकाराकडून तें व्याकरण सर्व शाळांत चालण्यासाठीं मान्य करून घ्यावें. अशा रीतीनें उपक्रम केल्यास सर्वमान्य व एकरूप असें व्याकरण सर्व महाराष्ट्रामध्यें प्रचारांत येईल व एक चिरस्थायी उपयुक्ततेचें कार्य घडवून आणण्याचें श्रेय संमेलनाच्या व परिषदेच्या पदरांत पडेल. आपणा दोन कोटी महाराष्ट्रीयांची मराठी भाषा ज्याप्रमाणें एकरूप व सर्वांस समान

अशी आहे, त्याप्रमाणें आपल्या भाषेचें व्याकरणहि एकरूप असावें ही गोष्ट अभिलषणीय नाहीं असें कोण म्हणेल ? इंग्रजी भाषेचा व्याप सर्व जगभर असूनहि तिचें व्याकरण जसें एकरूप बनविण्यांत आलें आहे किंवा हिंदी भाषेचीहि अलीकडील पंडितांनीं जशी नीटनेटकी व्यवस्था लावली आहे तसें मराठीच्या बाबतींत करण्याचा प्रयत्न अवश्य झाला पाहिजे.

मराठी व्याकरणाचा विचार करणारे आपल्याकडे जे गृहस्थ आजपर्यंत झाले आहेत ते सर्व इंग्रजी व संस्कृत (आणि फार तर फारशी व प्राकृत) या भाषांचे ज्ञाते होते. दादोबा, जांभेकरशास्त्री इ. आद्य व्याकरणकारांचा भर बहुतांशीं इंग्रजी व्याकरणावरच होता. पुढें दादोबांनीं संस्कृत व्याकरणाची चांगली माहिती करून घेतली व संस्कृत व्याकरणाच्या दृष्टीनें आमच्या व्याकरणांत पुष्कळ सुधारणा केली. त्यानंतर कृष्णशास्त्री चिपळूणकरांनीं व्याकरणविषयांत ऐतिहासिक दृष्टीनें विवेचन करण्याची आवश्यकता प्रतिपादन केली व प्राकृत भाषांच्या विसरलेल्या दुव्याची जाणीव अभ्यासकांस करून दिली. त्याच सुमारास कृष्णशास्त्री गोडबोले यांनीं वररुचीच्या प्राकृतप्रकाशाचा स्वतः अभ्यास करून प्राकृत भाषेचा प्रकाश मराठी व्याकरणावर पाडण्याचा यत्न केला. रा. भि. जोशांनीं या शास्त्रीद्वयाच्या प्रयत्नांचें संकलन केलें. राजवाड्यांनीं तर संस्कृत, प्राकृत, अपभ्रंश या प्रणालीकडेच सर्वस्वीं लक्ष ठेवून आपलें 'ज्ञानेश्वरी मराठीचें' व्याकरण लिहिलें व मुसलमानी भाषांच्या मराठीवर झालेल्या परिणामांचेंहि त्यांनींच प्रथमतः विस्तृत विवरण केलें. येथपर्यंत होत आलेली प्रगति योग्य दिशेनेंच होत आहे याबद्दल वाद नाहीं. परंतु यांत अजून एक मोठी उणीव राहिलेली सर्वांच्या नजरेस आणणें जरूर आहे. मराठी भाषेला इंग्रजीसारख्या वैभवशाली मैत्रिणीचें साहाय्य जसें आवश्यक, संस्कृत, प्राकृत, अपभ्रंश या आईमाईंचें मार्गदर्शकत्व ज्याप्रमाणें अपरिहार्य, त्याचप्रमाणें हिंदी, गुजराथी, कानडी, या जिवाभावाच्या बहिणींचें पाठबळहि फार उपयुक्त होणार आहे. मराठीचें सर्वांगपरिपूर्ण व्याकरण करूं पाहणाऱ्यास मराठीला लागूनच पसरलेल्या गुजराथी, हिंदी व कानडी या भाषांच्या रचनेची व त्यांच्या व्याकरणाची चांगलीच माहिती असली पाहिजे. विशेषतः गुजराथी व हिंदी या संस्कृतोत्पन्न भाषांचें मराठीशीं फारच साम्य असल्यामुळें त्या भाषांतील व्याकरणकारांनीं आपआपल्या भाषांतील निरनिराळ्या प्रकारांची व्यवस्था कशी लावली आहे हें पाहाणें व त्यांतील कांहीं कल्पना उपयुक्त वाटल्यास त्यांचा स्वीकार करून आपल्या भाषेचें व्याकरण जास्त पद्धतशीर करणें हें मराठी व्याकरणकारांचें कर्तव्यच ठरणार आहे.

याच दिशेनें अगदीं अल्पसा प्रयत्न येथें करण्याचा विचार आहे. हिंदी व्याकरणाच्या अनुरोधानें, ( परंतु संस्कृत, इंग्रजी इ. भाषांच्या व्याकरणावरील आपलें लक्ष बिलकुल न सोडतां, ) मराठी व्याकरणांतील संज्ञांविषयीं विवेचन करणें हा या लेखाचा हेतु आहे. व्याकरणासारख्या शास्त्रामध्यें पारिभाषिक संज्ञांचें महत्त्व फार असतें.

संज्ञा निश्चित करून त्यांच्या व्याख्या नीट करण्यावरच व्याकरणशास्त्रांतील सर्व विषयांची व्यवस्थाहि अवलंबून असते. तेव्हां संज्ञांचा विषय, 'नुसत्या नांवांत काय आहे ?' असें म्हणून तुच्छ करून चालणार नाहीं.

प्रथम, शब्दांच्या विभागांत ज्या संज्ञा दिल्या आहेत त्यांजकडे वळूं. शब्दांच्या जाति सांगण्यामध्येंसुद्धां आमच्या व्याकरणकारांमध्यें बराच घोटाळा व मतवैचित्र्य दिसून येतें! इंग्रजी व्याकरणांतील पद्धतीप्रमाणें शब्दांचे प्रथम सविभक्तिक ( declinable ) व अविभक्तिक ( indeclinable ) असे स्थूल विभाग पाडून, सविभक्तिक शब्दांचे नाम, सर्वनाम, विशेषण व क्रियापद असे चार आणि अविभक्तिक शब्दांचे क्रियाविशेषण, शब्दयोगी, उभयान्वयी आणि केवलप्रयोगी असे चार-याप्रमाणें शब्दांचे एकंदर आठ विभाग करण्याचा पायंडा दादोबादिकांनीं पाडला. ही अष्टविभागात्मक पद्धतीच मराठीच्या स्वभावास अनुसरून असून हिंदी, गुजराथी वगैरे भाषांच्या व्याकरणामध्यें तीच स्वीकारलेली आहे. असें असतां आमच्या कांहीं व्याकरणकारांस संस्कृताचें निरर्थक अनुकरण करण्याची बुद्धि व्हावी, व त्यामुळें ह्या साध्या गोष्टींतहि घोटाळा माजावा ही दुर्दैवाची गोष्ट होय. रा. भि. जोशी यांनीं आपल्या व्याकरणांत शब्दांचे ( १ ) प्रातिपदिकें, ( २ ) क्रियापदें आणि ( ३ ) अव्ययें असे तीन भेद केले असून त्यांपैकीं प्रातिपदिकांचे ( १ ) नामें, ( २ ) विशेषणें, ( ३ ) सर्वनामें असे तीन पोटभेद केले आहेत. राजवाडे तर ( १ ) नाम, ( २ ) क्रिया आणि ( ३ ) निपात असे तीनच भेद मानितात असें त्यांच्या ज्ञानेश्वरीच्या व्याकरणावरून दिसतें.

वस्तुतः 'प्रातिपदिक' ही संस्कृत व्याकरणांतील संज्ञा मराठींत आणण्याची कांहीं गरज दिसत नाहीं. मराठीसारखीच ज्या भाषेची रचना आहे, अशा हिंदी भाषेच्या व्याकरणांत ही संज्ञा त्या भाषेच्या व्याकरणकारांनीं आणलेली दिसत नाहीं. संस्कृतामध्यें नाम, सर्वनाम, विशेषण व अव्यय या चारी जातींच्या शब्दांस विभक्तिकार्य एका तऱ्हेनेंच होतें; यास्तव त्या सर्वांचा प्रातिपदिक या संज्ञेनें एकत्र संग्रह करणें जरूर होतें. परंतु मराठींत या सर्व निरनिराळ्या जातींच्या शब्दांना 'प्रातिपदिक' या नांवाखालीं एकत्र आणून त्यांची आवळ्याची मोट बांधणें अगदीं अप्रयोजकपणाचें होणार आहे. मराठींत नामांसारखें विभक्तिकार्य विशेषणांस होत नाहीं. फक्त आकारांत विशेषणांचें, विशेष्य प्रथमेतर विभक्तींत असल्यास, सामान्यरूप होतें, तेव्हां विशेषणांचा भेद निराळा मानणें अगदीं अवश्य. सर्वनामांचा प्रकारहि स्वरूपभिन्नत्वास्तव व कार्यभिन्नत्वास्तव निराळा मानणें अवश्यच आहे. संस्कृतांत देखील कार्यभिन्नत्वास्तव सर्वनामांचा गट निराळा मानावा लागलाच आहे. अव्ययांस तर संस्कृतांत विभक्तिकार्य सांगितलें आहे तसें मराठींत कोणीहि व्याकरणकार सांगत नाहीं. तेव्हां संस्कृतांत समानकार्यास्तव निर्माण केलेली 'प्रातिपदिक' ही संज्ञा मराठींत आणण्याचें कांहीं प्रयोजन दिसत नाहीं. शिवाय प्रातिपदिक ही संज्ञा स्वीकारणाऱ्या व्याकरणकारांच्या पदरांत एक मोठीच विसंगति पडूं पाहते. संस्कृत व्याकरणांत प्रातिपदिक या संज्ञेंतून क्रियापद वगळण्यावरच

मुख्य रोख आहे. अर्थात् अव्ययांचाहि अंतर्भाव तेथें प्रातिपदिकांत केला आहे. परंतु मराठींत ' प्रातिपदिक ' संज्ञा स्वीकारणाऱ्यांपैकीं कोणीहि त्या संज्ञेंत अव्ययांचा अंतर्भाव केलेला दिसत नाहीं. अव्ययांस मराठींत विभक्तिकार्य होत नाहीं म्हणून त्यांस वगळलें असें कोणी म्हणेल तर तेंहि जुळत नाहीं. मराठींत विशेषणांसहि विभक्तिकार्य होत नाहीं व अव्ययांसहि ' येथला, येथल्याप्रमाणें ' इ० उदाहरणांत क्वचित् विभक्तिकार्य झालेलें दिसून येतें. तेव्हां एकास वगळून एकास स्वीकारण्यांत निष्कारण पक्षपात होतो. तात्पर्य, मराठी व्याकरणांत प्रातिपदिक ही संज्ञा अनवश्यक व घोटाळा उत्पन्न करणारी अशी होत असल्यामुळें तिचा स्वीकार करणें अप्रशस्त होय, ही गोष्ट कोणासहि सहज दिसून येईल.

तेव्हां मराठी संबंधानें व इतर आधुनिक भाषांसंबंधानें विचार करितां, इंग्रजी पद्धतीप्रमाणें शब्दांच्या आठ जाती मानणें हेंच एकंदरीनें श्रेयस्कर होय ही गोष्ट सहज लक्षांत येईल. आतां या आठ जातींना दादोबा प्रभृतींनीं दिलेल्या संज्ञांचा विचार करूं. प्रथमतः declinable व indeclinable हे जे इंग्रजींत मानिलेले शब्दांचे दोन स्थूल विभाग त्यांजविषयीं विचार करूं. declinable व indeclinable या शब्दांस त्यांनीं 'सविभक्तिक' व 'अविभक्तिक' असे प्रतिशब्द बनविले आहेत व तेच आजपर्यंत सामान्यतः चालत आले आहेत. परंतु त्यांपेक्षां हिंदी व्याकरणकारांनीं घेतलेले 'विकारी' व 'अविकारी हे शब्द किती तरी चांगले व सुटसुटीत आहेत. क्रियापदांस लागणाऱ्या प्रत्ययास मराठींत आपण 'विभक्ति' म्हणत नसल्यामुळें 'सविभक्तिक' हा शब्द क्रियापदांस नीटसा लागू पडण्याजोगा नाहीं. त्याचप्रमाणें विशेषणांसहि विभक्ति लागत नसल्यामुळें त्यांस 'सविभक्तिक' शब्द म्हणणें कसेंसेंच दिसतें. या सर्व गोष्टींचा विचार करून दामले यांनीं आपल्या 'शास्त्रीय व्याकरणां'त 'विकारी' व 'अविकारी' हेंच शब्द उपयोजिले आहेत व तेच शब्द यापुढें सर्वत्र रूढ केले जाणें अवश्य आहे.

शब्दांच्या आठ जातींस जीं नांवें रूढ झालेलीं आहेत, त्यांपैकीं 'क्रियापद' हें नांव दामल्यांनीं त्याज्य ठरवून, त्या ऐवजीं 'क्रिया' किंवा 'धातु' ही संज्ञा योजिली आहे. चरमप्रत्यय लागून वाक्यांत प्रयुक्त होण्यास योग्य झालेला जो शब्द त्यास 'पद' म्हणतात. तेव्हां 'क्रियापद' हा शब्द वाक्यांत प्रयुक्त झालेल्या सप्रत्यय क्रियेसच लावणें योग्य, तो वर्गीकरणामध्यें शब्दाची जात सांगतांना वापरणें युक्त नव्हे. यास्तव दामल्यांनीं 'क्रिया' हाच शब्द उपयोगांत आणिलेला असून हिंदी व्याकरणांतहि तोच प्रचलित आहे. मराठींतहि सर्वत्र तोच रूढ करावा असें वाटतें. दुसरा एक चमत्कारिक शब्द 'केवलप्रयोगी' हा होय. अविकारी शब्दांच्या अथवा अव्ययांच्या चार प्रकारांपैकीं हा शेवटचा प्रकार असून यास इंग्रजींत interjection असें नांव आहे. Interjection या शब्दाची व्याख्या धात्वर्थास अनुसरून इंग्रजींत पुढीलप्रमाणें दिलेली आढळते 'A word thrown in between words connected in construc-

tion, to express some emotion or passion.' 'केवलप्रयोगी' हा शब्द हा अर्थ व्यक्त करण्यास असमर्थ आहे. त्यापेक्षां दादोबांनींच त्याचा पर्याय शब्द म्हणून दिलेला 'उद्गारवाची' हा, किंवा हिंदी व्याकरणांत प्रचलित असलेला 'विस्मयादिबोधक' हा, हे शब्द अधिक अन्वर्थक व समर्पक आहेत. तेव्हां यांपैकीं कोणता तरी एक शब्द सर्वत्र प्रचारांत आणावा हें योग्य होय.

अविकारी शब्दांच्या अथवा अव्ययांच्या चार जाती मानणें ही गोष्ट कित्येक व्याकरणकारांस मान्य नाहीं असें दिसतें. जोशीबुवा आपल्या 'बालबोध व्याकरणां'त अव्ययांच्या चारी जाती यथास्थित नमूद करितात, परंतु आपल्या 'प्रौढबोध व्याकरणांत' त्यांनीं यासंबंधानें दुटप्पीपणा केलेला दिसतो. प्रथम अर्थास अनुसरून अव्ययांचे तेवीस निरनिराळे प्रकार त्यांनीं सांगितले आहेत. व नंतर क्रियाविशेषणादि चार जातींचा हळूच मागल्या दारानें प्रवेश करून दिला आहे. परंतु पुढें लगेच असे चार प्रकार करण्यांत कांहीं फायदा नाहीं अशी त्याविषयीं अरुचीहि प्रकट केली आहे. अशा तऱ्हेचा अपलाप त्यांनीं कां केला असावा हें समजत नाहीं. आपलें जें कांहीं खरें मत असेल त्याप्रमाणेंच दोन्ही ठिकाणीं वर्णन करणें हें त्यांचें कर्तव्य होतें. 'हे (अव्ययांचे चार) प्रकार अशास्त्रतेस्तव संस्कृत व्याकरणांत नाहींत' असा शेरा राजवाडे ठोकून देतात. पाणिनीच्या संस्कृत व्याकरणांत अव्ययांचें वर्गीकरण पुढीलप्रमाणें केलें आहे. (आंकडे सूत्रांचे आहेत.)




पाणिनीच्या व्याकरणाचा व्यावहारिकपणा हा मोठा गुण आहे. वर दिलेलें अव्ययांचें वर्गीकरण पाहिलें तर तें संस्कृत भाषेच्या दृष्टीनें अत्यंत उपयुक्त व व्यावहारिक आहे असें दिसून येईल. अव्ययांचे विभाग करण्यासाठीं पाणिनीला निरनिराळे गण करावे लागले आहेत. यावरून या वर्गीकरणाला शास्त्रीयतेपेक्षां सोयीचा अधिक आधार आहे हें उघड दिसतें. शास्त्रीयतेच्या दृष्टीनेंच पहावयाचें झालें तर क्रियाविशेषण (adverb) शब्दयोगी (preposition and postposition), उभयान्वयी (conjunction), व उद्गारवाची interjection हेंच इंग्रजी वर्गीकरण सरस आहे यांत कांहीं शंका नाहीं. अव्ययांचे अर्थ, त्यांच्या वाक्यांत होणाऱ्या प्रयोगाचे भिन्न भिन्न प्रकार, वाक्यांतील इतर शब्दांशीं

त्यांचा असणारा संबंध, या सर्व गोष्टी लक्षांत घेऊन अव्ययांचे हे चार प्रकार केले आहेत; त्यांच्यावर अशास्त्रीयतेचा शिक्का एकदम ठोकून देणें हें अगदीं चुकीचें होय. हेंच इंग्रजी व्याकरणकारांनीं केलेलें शास्त्रीय वर्गीकरण स्वीकारण्यांत मराठी व्याकरण-कारांनीं योग्य तेंच केलें असून तेंच सर्वांनीं मान्य केलें पाहिजे.

यानंतर नामांच्या जातींकडे आपण वळूं. नामांच्या जाती 'सामान्यनाम' 'विशेषनाम' व 'भाववाचक नाम' अशा मराठी व्याकरणांत सर्वत्र सांगितल्या जातात. याच जातींस जातिवाचक, व्यक्तिवाचक व भाववाचक अशा संज्ञा हिंदी व्याकरणांत दिलेल्या आढळतात. तरी त्या आपणांस स्वीकारणीय आहेत कीं काय याचा मराठी व्याकरणकारांनीं विचार करावा. सामान्य नाम हें Common noun याचें अगदीं स्वत्वशून्य व नेभळट अनुकरण असें भासतें. यापेक्षां जातिवाचक व व्यक्तिवाचक हीं नांवें आपल्या पूर्वपरंपरेस अनुसरून असलेलीं अधिक गोड व समर्पक वाटतात.

आतां नामांचें विकरण ऊर्फ विभक्ति या महत्त्वाच्या विषयाचा थोडकासा परामर्श घेऊं. विभक्तींच्या संबंधानें आमच्या व्याकरणकारांमध्यें मतामतांचा जो गलबला माजला आहे त्याचें वर्णन करावें तेवढें थोडेंच आहे ! विभक्ति ह्या अर्थावरून मानाव्या कीं प्रत्ययांवरून मानाव्या असा एक विलक्षणच मुद्दा उपस्थित करून त्यावर दादोबांपासून तों दामल्यांपर्यंत सर्वांनीं वादाचें रण माजविलें आहे. या सामान्य प्रश्नावरून उद्भूत होणारे जे कित्येक विभक्तींसंबंधाचे विशिष्ट प्रश्न त्यांच्या संबंधानेंहि पुष्कळ मतभेद वसत असून निरनिराळ्या व्याकरणकारांनीं त्यांची निरनिराळी व्यवस्था लावलेली दिसून येते. मराठींत कर्त्याच्या अर्थी जें शब्दाचें रूप होतें तें कर्तरि प्रयोगांत विभक्ति-प्रत्ययरहित असतें, उदा. रामा काम करितो; घोडे गाड्या ओढतात इ.; हें जें विभक्ति प्रत्ययरहित शब्दाचें रूप त्यासच व्याकरणकार प्रथमा म्हणतात. परंतु मराठींत कर्त्याप्रमाणेंच कर्माच्या अर्थी येणारें शब्दाचें रूपहि पुष्कळवेळां विभक्तिप्रत्ययरहित असतें. उदाहरणार्थ, वरील वाक्यांमध्येंच 'काम' व 'गाड्या' हीं कर्में असून त्यांना विभक्तीचा कोणताहि प्रत्यय लागलेला नाहीं. अशा तऱ्हेच्या कर्मार्थक शब्दांची विभक्ति प्रथमा म्हणावी कीं द्वितीया याविषयीं वाद माजलेला असून, अर्थावरून विभक्ति मानाव्या असें म्हणणारे हिला द्वितीया म्हणतात, तर प्रत्ययावरून विभक्ति मानाव्या असें म्हणणारे हिलाच प्रथमा म्हणतात. त्याचप्रमाणें स, ला, तें हे प्रत्यय लागून होणारे शब्द कर्म व संप्रदान या दोन्ही अर्थी वाक्यांत योजिले जातात. उदा०—रामा गोविंदास मारतो; रामा गोविंदाला पैसे देतो. यांतील पहिल्या वाक्यांत 'गोविंदास' हें कर्म असून दुसऱ्या वाक्यांतील 'गोविंदाला' हें संप्रदान आहे. या ठिकाणींहि प्रत्ययवादी व्याकरणकार या दोन्ही उदाहरणांतील विभक्तीस 'चतुर्थी' हें एकच नांव देतात, तर अर्थवादी व्याकरणकार कर्म हा अर्थ असेल तेथें द्वितीया व इतर अर्थी चतुर्थी असा भेद करितात.

रा. भि. जोशी प्रभृति अर्थवादी व्याकरणकारांच्या मतें द्वितीया विभक्ति ही दोन प्रकारची होऊं शकते हें वरील उपपादनावरून सहज लक्षांत येईल. रामा काम

करितो,' यांतील 'काम' याची 'अप्रत्यय' द्वितीया व 'रामा गोविंदास मारतो' यांतील 'गोविंदास' याची 'सप्रत्यय' द्वितीया. दादोबा वगैरे कांहीं व्याकरणकार या बाबतींत दोन्ही डगरींवर हात ठेवणारे आहेत. ते प्रत्ययाभावीं, अर्थ जरी कर्म असला तरी, प्रथमा विभक्ति मानतात परंतु स, ला, तें हे प्रत्यय लागले असतां कर्म असेल तेथें द्वितीया व संप्रदानादि अर्थ असतील तेथें चतुर्थी असा अर्थास अनुसरून भेद करितात. चिपळूणकर व गोडबोले या शास्त्रिद्वयानें केवळ प्रत्ययवाद स्वीकारून द्वितीया विभक्तीचा मराठींत अजीबात अभावच मानिला आहे. दामल्यांनींहि तोच पंथ अनुसरला आहे.

हा सर्व घोटाळा ' विभक्ति ' या शब्दाचा खरा अर्थ लक्षांत न घेतल्यामुळें बऱ्याच अंशीं उत्पन्न झाला असावा. ' विभक्ति' हा पाणिनीच्या संस्कृत व्याकरणांतील एक पारिभाषिक शब्द ( संज्ञा ) आहे व तेथूनच तो मराठींत घेण्यांत आला आहे हें उघड आहे. प्रातिपदिकांस जे 'सु, औ, जस्' इ० चरम प्रत्यय लागतात व धातूंस जे 'तिप्, तस्, झि' इ० प्रत्यय लागतात त्या सर्वांस पाणिनीच्या व्याकरणांत 'विभक्ति' ही संज्ञा आहे. यावरून विभक्ति म्हणजे दुसरें तिसरें कांहीं नसून केवळ 'प्रत्यय' होत ही गोष्ट सहज लक्षांत येईल. परंतु या सहज लक्षांत येण्याजोग्या गोष्टीकडे लक्ष न गेल्याकारणानें सर्व व्याकरणकार भ्रमाच्या भोंवऱ्यांत गिरक्या खात बसले आहेत. विभक्ति म्हणजे जर केवळ प्रत्ययच होत तर 'विभक्ति प्रत्ययावरून मानावयाच्या कीं अर्थावरून मानावयाच्या !' असा वाद उपस्थित करणें हें अगदींच निरर्थक ठरतें. आतां, विभक्ति म्हणजे नामांस व धातूंस लागणारे चरम प्रत्यय असा जरी त्या शब्दाचा मूळ अर्थ असला तरी संस्कृतांतहि लक्षणेनें 'विभक्तिप्रत्यय लागून तयार झालेला शब्द' या अर्थी विभक्ति या शब्दाचा उपयोग कधीं कधीं करण्यांत होतो.

उदाहरणार्थः—" 'रामः' इयं प्रथमा विभक्तिः" असें संस्कृतांत सुद्धां म्हणण्यांत येतें. तेव्हां मराठींतहि अशाच तऱ्हेच्या लक्षणेचा स्वीकार करून प्रत्ययान्त शब्दाला, किंवा प्रत्यय लागून नाम, सर्वनाम यांना होणारी जी विकृति तिला, विभक्ति म्हटलें तर त्यांत गैर असें काय आहे ? असाहि यावर कोटिक्रम करणें शक्य आहे. आणि त्या कोटिक्रमांत बराचसा अर्थहि आहे. तथापि 'विभक्ति' या शब्दाचा रूढार्थ मराठींत जरी अशा तऱ्हेचा असला आणि व्याकरणकारांनीं त्या शब्दाच्या व्याख्याहि जरी त्या मूलार्थासच अनुसरून केलेल्या असल्या, तरी त्यांनीं 'विभक्ति' या शब्दाच्या मूळार्थास अजीबात विसरून जाणें हें युक्त नव्हतें. विभक्ति म्हणजेच संस्कृतांतील 'स्वौजंसमौट्' इ०, किंवा मराठींतील 'स, ला, तें' इ० प्रत्यय ही गोष्ट लक्षांत ठेविली असती व संस्कृतांत प्रथमा, द्वितीया, तृतीया, इ० जो विभक्तींचा विभाग केलेला आहे, तो प्रत्ययांच्या भिन्नत्वावरूनच केलेला आहे ही गोष्ट ध्यानांत बाळगली असती म्हणजे झाला हा घोटाळा कदापि झाला नसता. परंतु प्रारंभींच्या दादोबाप्रभृति वैयाकरणांचें लक्ष इंग्रजी व्याकरणाकडेच विशेष असल्यामुळें इंग्रजींतील

Case हा शब्द त्यांच्या मनांत घोळत होता. त्यांनीं Case या शब्दाची इंग्रजींतील व्याख्या घेतली आणि ती, 'विभक्ति' हा एक संस्कृत व्याकरणांतील साधारणपणें रूढ असलेला शब्द पकडून त्याला चिकटवून दिली. अशा रीतीनें मराठी व्याकरणांतील 'विभक्ति' प्रकरण निर्माण झालें.

वर केलेल्या विवेचनावरून, विभक्ति ही प्रत्ययांचीच संज्ञा आहे व प्रत्ययांच्या भिन्नत्वावरूनच विभक्तींचें भिन्नत्व मानावयास पाहिजे या गोष्टी वाचकांस पटल्या असतीलच. यावरून, केवळ प्रत्ययवादी असे जे कृष्णशास्त्री गोडबोले, कृ. शा. चिपळूणकर आणि मो. के. दामले यांचाच पक्ष या बाबतींत सबळ आहे अशी ही सर्वांची खात्री होईल. मात्र वरील तिघांपैकीं कृष्णशास्त्रीद्वयानें 'षष्ठी ही विशेषणरूपच असल्यानें तिला विभक्ति मानूं नये' असा एक विलक्षण पूर्वपक्ष उपस्थित केला होता. परंतु दामले यांनीं त्याचें यथास्थित खंडन करून षष्ठीला विभक्तींत गणलेंच पाहिजे असें सप्रमाण सिद्ध केलें आहे. तेव्हां एकंदरींत शास्त्रीय दृष्टीनें पाहिलें असतां मराठींत प्रथमा, तृतीया, चतुर्थी, पंचमी, षष्ठी व सप्तमी या विभक्ति राहतात व तेवढ्याच व्याकरणकारांनीं मानल्या पाहिजेत असें झालें.

परंतु या व्यवस्थेमुळें दोन मोठे दोष उत्पन्न होतात. केवळ संख्येचा क्रम दाखविणारीं जीं प्रथमादिक नांवें त्यांतून मधलेंच एक द्वितीयेचें नांव अजीबात लुप्त करून टाकणें ही गोष्ट अगदीं अशुद्ध व चमत्कारिक दिसते. सहा ब्राह्मण जेवावयाचे आहेत तर त्यांच्यासाठीं सात पाट मांडून ठेवून मधला एक पाट मुद्दाम रिकामा ठेवणें हें जितकें चमत्कारिक तितकेंच हें चमत्कारिक दिसतें. परंतु, अमुक अर्थास अमुक विभक्ति हा संस्कृत व्याकरणांतील संकेत आपल्या हाडींमासीं खिळून गेल्यामुळें, हा विद्रूपपणा विभक्तींच्या बाबतींत सहन करावा लागतो. नाहींतर सर्व विभक्तींचीं नांवें क्रमानें आपण शेवटच्या विभक्तीचें-सध्यांच्या सप्तमीचें-नांव षष्ठीच ठेविलें असतें. असो. या व्यवस्थेंतील दुसरा दोषहि संस्कृत व्याकरणांतील एक कल्पना दादोबाप्रभृतींनीं प्रथमपासून सुरू करून आमच्या हाडींमासीं खिळवून टाकल्यामुळेंच भासमान होणारा आहे. ' कर्मणि द्वितीया ', ' कर्माची विभक्ति द्वितीयाच असली पाहिजे' हा पाणिनीच्या व्याकरणांतील नियम आमच्या मनांत दृढमूल झाला असल्याकारणानें, मराठींत कर्माची विभक्ति द्वितीया कोठेंच न होतां कांहीं ठिकाणीं प्रथमा व कांहीं ठिकाणीं चतुर्थी व्हावी ही गोष्ट पुष्कळांस फार चमत्कारिक वाटते. म्हणूनच, जोशी, खरे वगैरे बऱ्याच व्याकरणकारांनीं अर्थास अनुसरून विभक्ति ठरविण्याचें तत्त्व स्वीकारून कर्माच्या अर्थीं द्वितीया विभक्ति मान्य केली आहे व दादोबांनींहि अर्धवट तोच पंथ स्वीकारला आहे.

हा सर्व घोटाळा, मराठी भाषेच्या बदललेल्या स्वभावाचा विचार न करितां संस्कृतांतील प्रथमा, द्वितीया इ० संज्ञा मराठी व्याकरणांत घुसविण्याच्या अट्टाहासामुळें उत्पन्न झालेला आहे. संस्कृत भाषा ही ( Synthetical ) अर्थात् प्रत्ययबहुल स्वरू-

पाची असल्यामुळें तिच्यांतील प्रत्ययव्यवस्था बहुतांशीं पूर्णावस्थेस गेलेली आहे. प्रत्येक विभक्तीचे प्रत्यय इतर कोणत्याहि विभक्तीच्या प्रत्ययांहून कोठें ना कोठें तरी निराळे असल्यामुळें प्रत्ययनिष्ठ विभाग करून प्रत्येक विभक्तीस निरनिराळें नांव देणें संस्कृत व्याकरणकारांस सुलभ झालें. मराठी ही संस्कृताइतकी संघटित किंवा प्रत्ययबहुल भाषा राहिलेली नसल्यामुळें मराठींतील प्रत्ययांची व्यवस्था बरीचशी विकल व विस्कळीत झाली आहे. कर्त्याच्या व कर्माच्या अर्थीं मराठींत बहुतेक ठिकाणीं प्रत्ययच लागत नाहीं. स, ला, तें हे प्रत्यय संप्रदानाच्या अर्थीं, कर्माच्या अर्थीं व क्वचित् कर्त्याच्या अर्थींहि लागतात. याशिवाय बहुतेक कारकांच्या अर्थीं अनेक शब्दयोगी अव्ययें सररास उपयोगांत येतात. जुन्या कवितेंत तर शब्दाचें केवळ सामान्यरूप, किंवा मूळरूपसुद्धां, बहुधा वाटेल त्या कारकाच्या ऐवजीं सररास उपयोजिलें जातें; व अर्वाचीन कवितेंतहि हा प्रकार चतुर्थी व षष्ठी या दोन विभक्तींच्या स्थलीं चालूच आहे. अशा स्थितींत 'विभक्ति' ही संस्कृत व्याकरणांत केवळ प्रत्ययांना दिलेली संज्ञा व त्या प्रत्ययांच्या भिन्नत्वावरच मुख्य लक्ष ठेवून केलेले विभक्तींचे 'प्रथमा, द्वितीया' इत्यादि विभाग— हे मराठींत आणण्याची खरोखर कितपत जरूर आहे, याचा विचार आमच्या व्याकरणकारांनीं अवश्य करावयास पाहिजे होता.

याच दिशेनें विचार करण्यास सहायभूत म्हणून हिंदी भाषेच्या व्याकरणांत या सर्व विषयाची काय व्यवस्था लावली आहे ती प्रस्तुत लेखांत पुढें मांडण्याचें योजिलें आहे. ती व्यवस्था मोठी सुटसुटीत व आपल्या आधुनिक भाषांच्या स्वभावास अनुकूल असून; पूर्वग्रह बाजूला ठेवून मराठी व्याकरणकारांनीं तिजकडे पाहिल्यास त्यांस ती पटेल अशी आशा बाळण्यास हरकत नाहीं.

ज्याला आपण मराठींत 'विभक्ति' म्हणतों व इंग्रजींत ज्याला case म्हणतात त्यालाच हिंदीमध्यें 'कारक' म्हणतात व कारक दर्शविण्याकरितां नाम व सर्वनाम यांना लागणारे जे प्रत्यय त्यांना 'विभक्ति' म्हणतात. 'कारका'ची व्याख्या हिंदीव्याकरणांत पुढीलप्रमाणें दोन प्रकारांनीं केलेली आढळते.— १. संज्ञा ( या सर्वनाम ) के जिस रूपसे उसका संबंध वाक्यके किसी दूसरे शब्द के साथ प्रकाशित होता है, उस रूपको कारक कहते हैं; २ जिससे संज्ञा या सर्वनाम का क्रिया या वाक्यके अन्य शब्दों के साथ संबंध ज्ञात होता है उसे कारक कहते हैं। पहिल्या व्याख्येमध्यें वाक्यांतील दुसऱ्या कोणत्याहि शब्दांशीं संबंध दाखविण्यास समर्थ असें जें **नामाचें रूप** त्यास कारक म्हटलें आहे. 'नामाचा वाक्यांतील दुसऱ्या शब्दांबरोबर असलेला संबंध ज्यामुळें ज्ञात होतो तें कारक' असा दुसऱ्या व्याख्येचा अर्थ आहे. अर्थात् 'नामाला होणारी विकृति' किंवा 'नामाचें प्रत्ययान्त रूप' अशा दोन्ही गोष्टी या व्याख्येमध्यें अभिप्रेत असूं शकतील. आमच्या सर्व मराठी व्याकरणकारांच्या 'विभक्ती'-च्या व्याख्या 'कारका'च्या ह्या व्याख्यांप्रमाणेंच आहेत; यावरून मराठी व्याकरणांतील 'विभक्ति' शब्दालाच हिंदी व्याकरणांतील 'कारक' हा शब्द साधारणतः प्रतिशब्द

शोभणारा आहे हें लक्षांत येईल. हीं कारकें एकंदर आठ मानलीं आहेतः—कर्ता, कर्म, करण, संप्रदान, अपादान, संबंध, अधिकरण, संबोधन.

तेव्हां हिंदी व्याकरणामध्यें 'विभक्ति' या शब्दाऐवजीं 'कारक' हा शब्दच प्रचलित असल्यामुळें वाक्यामध्यें नामाची विभक्ति सांगताना 'प्रथमा विभक्ति', 'द्वितीया विभक्ति' असे शब्द न योजतां 'कर्ताकारक,' 'कर्मकारक' अशाच संज्ञा त्याऐवजीं योजितात. हीं कारकें जीं ठरविलीं आहेत तीं अलबत् अर्थावरूनच ठरविलीं आहेत. कारण, 'कारक'हें नांव एकदां योजिल्यानंतर त्या कारकाकडे ( म्हणजे प्रत्ययाच्या अर्थाकडे ) न बघतां केवळ प्रत्ययांवरच भिस्त ठेवणें हें असमंजसपणाचें झालें असतें. अर्थात् या पद्धतीमध्यें विभक्ति अर्थावरून मानाव्या कीं प्रत्ययावरून मानाव्या या वादाचें मूळच नाहींसें होऊन, प्रथमा-द्वितीया व द्वितीया-चतुर्थी या विभक्तींविभक्तीं-मधल्या भानगडींचा लवलेशहि उरत नाहीं. वाक्यांतील नाम जेथें कर्ता असेल तेथें त्यास 'कर्ताकारक' म्हणावयाचें, मग तें नाम अप्रत्यय ( म्हणजे सध्यांच्या परिभाषेप्र-माणें प्रथमान्त ) असो वा 'नें' प्रत्ययान्त ( म्हणजे तृतीयान्त ) असो. त्याचप्रमाणें कर्मकारकाचीहि गोष्ट. मात्र प्रत्यय असल्यास 'सप्रत्यय कर्ताकारक वा कर्मकारक' आणि प्रत्यय नसल्यास 'अप्रत्यय कर्ताकारक वा कर्मकारक' असे पोटभेद करण्याची चाल आहे. उदाहरणार्थ आपण एक लहानसें वाक्य घेऊं.—सोमदेवने बलदेवको एक आम दिया। यांत जीं तीन नामें आहेत त्यांचें व्याकरण हिंदी पद्धतीस अनुस-रून पुढें दिल्याप्रमाणें होईल.

१ सोमदेव ने—व्यक्तिवाचक संज्ञा, पुँल्लिंग, एकवचन, सप्रत्यय कर्ताकारक 'दिया' क्रियासे अन्वित।

२ बलदेव को—व्यक्तिवाचक संज्ञा, पुँल्लिंग, ए. व. संप्रदान कारक, 'दिया' क्रियासे अन्वित।

३ आम—जातिवाचक संज्ञा, पुंल्लिंग, ए. व., अप्रत्यय कर्मकारक, 'दिया' क्रियाका कर्म।

वर केलेल्या विवरणावरून हिंदी व्याकरणांतील पद्धतीचें वाचकांस यथास्थित ज्ञान होईल अशी उमेद आहे. 'तो गाय बांधितो', 'तो गाईस बांधितो', 'त्यानें गाय बांधिली' व 'त्यानें गाईस बांधिलें'—या चार वाक्यांपैकीं पहिल्या व तिसऱ्या वाक्यांत 'गाय' हें 'अप्रत्यय कर्मकारक', दुसऱ्या व चौथ्या वाक्यांत गाईस हें 'सप्रत्यय कर्म-कारक' आहे. मात्र तिसऱ्या वाक्यांत त्यानें हें 'सप्रत्यय कर्ताकारक' असून बांधिली या क्रियापदाचा कर्मणिप्रयोग आहे तर पहिल्या वाक्यांत तो हें 'अप्रत्यय कर्ताकारक' असून बांधितो हा कर्तरिप्रयोग आहे. त्याचप्रमाणें दुसऱ्या वाक्यांत कर्तरिप्रयोग असून चवथ्या वाक्यांत 'त्यानें' हें सप्रत्यय कर्ताकारक व बांधिलें हा भावेप्रयोग अशी स्थिति आहे. याप्रमाणें सर्व तऱ्हेच्या प्रयोगांत ही व्यवस्था सुरेख जमते.

आतां अगदीं क्वचित् येणारीं कांहीं अडनिडीं उदाहरणें हीं राहतातच. कोण-चीहि व्याकरणाची पद्धति स्वीकारली तरी ती खच्याळपणा थोडाबहुत करणारच. उदाहरणार्थ:— 'त्याला गाणें आवडतें', 'मला कळमळतें', 'तो दिवसाचा चालतो' इ० यांपैकीं 'त्याला' व 'मला' यांचें स्पष्टीकरण 'कर्त्याच्या अर्थीं संप्रदानकारक' असें म्हणून करतां येतें व तिसऱ्या वाक्यांतील 'दिवसाचा' याचें स्पष्टीकरण 'अधिकरणार्थीं संबंधकारक' असें म्हणून सुरेख रीतीनें होऊं शकतें.

याप्रमाणें हिंदी व्याकरणांतील ही व्यवस्था मराठीच्या वैयाकरणांपुढें मांडली आहे. सध्यां मराठींत प्रचलित असलेल्या पद्धतीपेक्षां ही हिंदी व्याकरणांतील पद्धत अनेक दृष्टींनीं सरस आहे. ही पद्धति स्वीकारल्यानें होणारे फायदे थोडक्यांत पुढील-प्रमाणें सांगतां येतील.

१ लाघव. लाघव हा गुण आमच्या प्राचीन शास्त्रकारांनीं, विशेषत: वैयाकर-णांनीं, फारच महत्त्वाचा मानिला आहे. 'अर्धमात्रालाघवेन पुत्रोत्सवं मन्यन्ते वैयाकरणा:' ही व्याकरणशास्त्रांतली परिभाषा या बाबतींमध्यें सुप्रसिद्ध आहे. आतां विभक्तींच्या ऐवजीं कारक मानिल्यानें कोणच्याहि प्रकारचा तोटा न होतां पुष्कळच लाघव साधल्या-प्रमाणें होईल ही गोष्ट दाखवून देणें फारसें अवघड नाहीं. सध्यांच्या व्याकरणांत नामाची वा सर्वनामाची आपण प्रथम विभक्ति सांगतों, नंतर विभक्तीचा अर्थ म्हणजे कारक सांगतों व शेवटीं तें कारक कोणत्या क्रियेशीं अन्वित आहे तें स्पष्ट करितों. हिंदी व्याकरणाची पद्धति अवलंबिल्यास वाक्यांतील नामाचें 'कारक' सांगून तें कोणत्या क्रियेशीं वा शब्दाशीं अन्वित आहे तें सांगितलें म्हणजे झालें. उदाहरणार्थ:— 'तो काम करितो' या वाक्यांत 'तो' याची प्रथमा विभक्ति, प्रथमेचा अर्थ कर्ता, 'करितो' या क्रियापदाचा" असें तीन टप्प्यांचें, स्पष्टीकरण न करितां " 'तो' हें अप्रत्यय कर्तृकारक 'करितो' या क्रियेशीं अन्वित" असें दोन टप्प्यांचें स्पष्टीकरण केलें म्हणजे यापुढें भागेल. विभक्तिविचार व कारकविचार अशीं जीं दोन प्रकरणें सध्यांच्या व्याकरणांत घातलीं जातात व त्यांमध्यें विषयांची पुनरुक्ति होऊन व विवेचनाची गुंतागुंत होऊन जो घोटाळा उडतो त्याची यापुढें कांहीं जरूरी राहणार नसून एक कारकप्रकरण घातल्यानेंच सर्व काम भागणार आहे.

२ सौकर्य. लाघवाचेंच तत्त्व अतिरेकाला नेलें म्हणजे कित्येक वेळां काठिन्याचा दोष पदरांत घ्यावा लागतो. परंतु प्रस्तुतच्या योजनेंत तसें बिलकुल होणार नसून उलट तिजमुळें आपल्या व्याकरणांत सुलभता जास्त येणार आहे. सध्यांच्या पद्धती-प्रमाणें अगोदर नामाची विभक्ति ठरवावयाची, नंतर त्याचें कारक काय तें पहावयाचें असा द्राविडी प्राणायाम करावा लागतो. बरें, नामाची विभक्ति अमुक एक आहे असें ठरविल्यानें त्याचें कारक निश्चित करण्यास हुकुमी मदत होतेच असें म्हणावें तर तसेंहि नाहीं. कारण एकाच विभक्तीचीं अनेक कारकें आहेत व एकच कारक अनेक विभक्तींत वाटून दिलेलें असाहि प्रकार आहे ! अर्थात् नामाची विभक्ति ठरविल्यानंतरहि कारक

ठरविण्याकरितां वाक्याचा अर्थ, त्या नामाचा इतर शब्दांशीं संबंध वगैरे गोष्टींकडे लक्ष द्यावें लागतेंच. त्यापेक्षां विभक्तींची भानगड मध्यें मुळींच न ठेवितां प्रत्यय व त्यांचे अर्थ या दोहोंकडेहि तारतम्यानें लक्ष ठेवून नामाचें कारकच एकदम सांगितलें म्हणजे झालें.

३. प्रस्तुतची योजना मराठी भाषेच्या स्वभावास अधिक अनुसरून आहे हाहि एक महत्त्वाचा मुद्दा लक्षांत ठेवण्याजोगा आहे. संस्कृतांतून प्राकृतादिकांच्या द्वारा विभक्तिप्रक्रिया घेतांना मराठीनें दोन विभक्तींचे प्रत्यय अजीबात गमावले आहेत व बाकीच्या कित्येक प्रत्ययांस दोन दोन तीन तीन कारकें सोंपवून दिलीं आहेत. अशा विस्कळीत झालेल्या प्रत्ययव्यवस्थेस संस्कृतांतील रेखीव व प्रत्ययनिष्ठ अशा प्रथमा, द्वितीया इत्यादि संज्ञा देणें हें अस्वाभाविकपणाचें होणार आहे. याच कारणास्तव हिंदीनें अर्थद्योतक अशा कर्तृकारक, कर्मकारक या संज्ञा स्वीकारल्या असून मराठी-नेंहि त्याच स्वीकारणें इष्ट आहेत. ह्या अर्थद्योतक संज्ञा स्वीकारल्या म्हणजे प्रत्यय सामान्यत: कोणताहि असो, अथवा मुळींच नसो, अर्थावरून शब्दाचें कारक सांगितलें जातें व कोणतीहि भानगड उरत नाहीं.

४. ही नवीन पद्धति अवलंबिल्यास विभक्तींच्या प्रश्नासंबंधानें आजपर्यंतच्या व्याकरणकारांमध्यें जो वाद माजून राहिला आहे त्या वादाचें कांहीं कारणच राहणार नाहीं, हाहि एक अत्यंत महत्त्वाचा फायदा होय. ही योजना जुन्या पद्धतींतच कांहीं सुधा-रणा सुचविणारी अशी नसून जुन्या पद्धतीच्या जागीं एक अजीबात नवीनच अशी पद्धति सुचविणारी असल्यानें ही अमलांत आल्यास ( म्हणजे सर्वांनीं मान्य केल्यास ) जुन्या सर्व वादांचा आपोआपच निरास होणार आहे. खुद्द नवीन पद्धतींतच होण्या-जोगीं अशीं स्थळें कांहीं नसल्यामुळें आणि तीं विचारी लोकांना मान्य झाल्यावरच अमलांत येणारीं असल्यामुळें तिच्या योगानें आणखी नवीन वाद उपस्थित होण्याची भीति वाळगण्यास नको. मराठी व्याकरणास सुरुवात झाल्यापासून आजपर्यंत या विभक्ति प्रकरणाबावत इतका वाद माजला आहे कीं अशी एकादी योजना निघून तो वाद माजी झाला तर त्यामुळें सर्व विचारी लोकांस आनंदच होईल. सध्यां या वादा-मुळें व तदुद्भूत अनिश्चिततेमुळें व्याकरण शिकणाऱ्यांचा व शिकविणाऱ्यांचा निष्कारण उत्साहव्यय होऊन त्यांस त्रास मात्र होतो. तो त्रास नाहींसा करणारी अशी एखादी योजना पुढें आल्यास तिला सर्व सुज्ञांनीं पाठिंबा दिला पाहिजे.

प्रस्तुत योजनेवर आक्षेप येण्यासारखे दिसतात असे दोनच. " ही योजना पूर्वपरंपरेस सोडून आहे, व्याकरणाच्या चालू प्रक्रियेंत अत्यंत मोठी क्रांति करणारी आहे, हिच्यापासून आमच्या पूर्वीपासून दृढबद्ध झालेल्या कल्पनांस मोठा धक्का बसून गोंधळ उडेल. "—अशा तऱ्हेचा हा पहिला आक्षेप होय. हा आक्षेप केवळ अपरिचिततेमुळें उत्पन्न होणारा होय. या बाबतींत ही गोष्ट स्पष्टपणें लक्षांत ठेवणें अवश्य आहे कीं या योजनेमुळें आम्ही प्रचलित भाषेमध्यें कोण-

ताहि नवीन प्रकार सुरू करीत नाहीं; तर अस्तित्वांत असलेल्याच गोष्टींची एक निराळ्या प्रकारची व्यवस्था सुचवीत आहोंत. अर्थात् लेखनपद्धतीमध्यें क्रांतिकारक फेरफार सुचविणें, इतकेंच नव्हे तर कोणासहि न विचारतां सवरतां असे फेरफार एकदम अमलांत आणणें, अशासारखी कोणतीहि गोष्ट यांत आम्ही करीत नसून फक्त व्याकरणांतील संज्ञांची एक नवीन व्यवस्था सुचवीत आहोंत. अस्तित्वांत असलेल्या गोष्टींमध्यें सुधारणा सुचविणें हा समाजांतील प्रत्येक व्यक्तीचा अधिकार आहे, व अशा रीतीनें एकाद्या व्यक्तीनें सुचविलेली सुधारणा ही अपरिचित आहे, पूर्वपरंपरेस सोडून आहे, एवढ्याच कारणास्तव तिला बाजूला सारणें हें केव्हांहि रास्त होणार नाहीं. यापेक्षां या आक्षेपावर जास्त लिहिण्याची जरूरी नाहीं.

दुसरा संभवनीय आक्षेप शास्त्रीय स्वरूपाचा आहे. वर सुचविलेल्या नवीन योजनेंत एकंदर आठ कारकें मानली असून त्यांत षष्ठी व संबोधन यांसहि कारकांमध्यें गणिलें आहे. यावर आक्षेप येणार तो इतकाच कीं षष्ठी व संबोधन यांस संस्कृतांत कारक मानलें नसतांना मराठींत तुम्ही त्यांस कारकांत गणणार ही गोष्ट शास्त्राच्या दृष्टीनें अत्यंत अशुद्ध होय. परंतु यास उत्तर एवढेंच कीं, संस्कृतांतील कारकाची व्याख्या षष्ठीचा त्यांत अंतर्भाव होईल अशा रीतीनें बदलूनच आम्ही मराठींत घेत असल्यामुळें संस्कृतांतील व्याख्येचें बंधन आम्हांस वाटण्याचें कारण नाहीं. संस्कृतांतील संज्ञा मराठींत घेतांना होतां होईतों त्यांच्या मूळ-अर्थासच धरून चालावें हें खरें; आणि आमच्या योजनेंत 'विभक्ति' या संज्ञेचा अर्थ आम्ही मूळ संस्कृतांतील अर्थाप्रमाणें सुधरून घेण्याची व्यवस्था केलीच आहे; परंतु जेथें अगदीं जरूरच असेल तेथें एकाद्या संज्ञेच्या मूळ अर्थांत थोडासा फरक केल्यास त्यांत विशेषसें बिघडेल असें आम्हांस वाटत नाहीं. नाम, सर्वनाम, आख्यात, इ. संज्ञांच्या अर्थांत ज्याप्रमाणें आपण आपल्या सोईप्रमाणें बदल करून घेतला आहे त्याप्रमाणेंच कारक या संज्ञेच्या बाबतींतहि करण्यास कांहीं हरकत नाहीं.

नामांच्या ( व सर्वनामांच्या ) विभक्तिव्यवस्थेसंबंधानें आतांपर्यंत विचार झाला. यापुढें विशेष महत्त्वाचा असा शब्दविभाग म्हणजे 'क्रिया' हा होय. 'क्रिये'संबंधानें विचार करण्यासारख्या बाबी, खरें म्हटलें तर पुष्कळच आहेत. नामांच्या प्रकरणांत आमच्या व्याकरणकारांनीं जितका घोटाळा व अनिश्चितपणा उत्पन्न केला आहे त्यापेक्षां कितीतरी पटीनें अधिक घोटाळा व अनिश्चितपणा क्रियापदासंबंधानें निर्माण केला आहे. तथापि, मध्यंतरी, एकाच महत्त्वाच्या मुद्याचा येथें उहापोह करून हें विवेचन आटपण्याचा विचार आहे.

क्रियेच्या रूपांत विकार करणाऱ्या व तिजला प्रयोगक्षम करणाऱ्या अशा गोष्टी एकंदर किती आहेत यासंबंधानेंच व्याकरणकारांमध्यें वाद आहे. 'क्रियापदास रूप, भेद, अर्थ, प्रयोग, काळ, पुरुष, लिंग, वचन हीं असतात' असें दादोबा म्हणतात. कृष्णशास्त्री चिपळूणकर रूप व भेद या दोन गोष्टी मानण्याचें कांहीं कारण नाहीं

असें ठरवून त्यांचें उच्चाटन करितात. जोशांनीं बहुतांशीं चिपळूणकरांचाच कित्ता गिरविला आहे. दामल्यांनीं तर काळ व अर्थ या दोन्ही संज्ञांचा अजीबात त्याग करून त्या दोहोंचाही समन्वय 'आख्यात' हें एक नवेंच सदर निर्माण करून त्यांत केला आहे. त्यांच्या मतें, 'प्रत्येक क्रियापदास आख्यात, पुरुष, लिंग आणि वचन हीं असतात, अथवा आख्यात, पुरुष, लिंग आणि वचन, ह्यांप्रमाणें धातूचें रूप पालटतें.'

दामल्यांच्या या योजनेमध्यें आख्याताची कल्पना तर नवीन आहेच परंतु धातूचें रूप पालटणाऱ्या गोष्टींमध्यें 'प्रयोगा'चा त्यांनीं अंतर्भाव केलेला नाहीं ही गोष्टहि लक्षांत घेण्याजोगी आहे. मराठींत 'प्रयोग' ही निराळी क्रियेचें रूप बदलविणारी गोष्ट असूं शकत नाहीं हें त्यांच्या लक्षांत आलें. इंग्रजीमध्यें voice म्हणून व संस्कृतांत 'यक्प्रक्रिया' म्हणून क्रियेचें व वाक्याचें स्वरूप बदलून टाकणारा जो प्रकार अस्तित्वांत आहे तशा तऱ्हेचा मराठींतील 'प्रयोग' हा प्रकार नाहीं. इंग्रजीमध्यें, व त्याचप्रमाणें संस्कृतामध्यें, क्रियेचें कोणत्याहि काळांतील कोणचेंहि रूप वक्त्याच्या मर्जीप्रमाणें कर्तरि किंवा कर्मणि करतां येतें. 'He does work' 'सः कर्म करोति' या वाक्यांतील क्रिया कर्तरि असून त्यांचेंच कर्मणि रूप करावयाचें झाल्यास Work is done by him आणि 'तेन कर्म क्रियते' अशीं वाक्यें होऊं शकतात व तीं कर्मप्रधान होतात. मराठींत कांहीं काळांमध्यें क्रियेचें रूप स्वभावतःच कर्त्याप्रमाणें चालणारें होतें तर कांहीं काळांमध्यें तें कर्माप्रमाणें चालणारें होतें. 'तो काम करितो' हें वर्तमानकाळीं कर्तरि वाक्य आहे, परंतु त्याचाच भूतकाळ करावयाचा झाला म्हणजे 'त्यानें काम केलें' असा कर्मणि करावा लागतो. म्हणजे भूतकाळांत 'केलें' हें क्रियापद कर्माप्रमाणें चालणारें होतें. त्याचप्रमाणें विध्यर्थ करावयाचा झाला तर 'त्यानें काम करावें' असा करावा लागतो व त्यांतही क्रियापद कर्मणीच होतें. परंतु 'तो काम करितो' हें वाक्य जितकें कर्तृप्रधान आहे तितकींच 'त्यानें काम केलें' व 'त्यानें काम करावें' हीं वाक्येंहि कर्तृप्रधान आहेत. केवळ वर्तमानाचा भूतकाळ व विध्यर्थ करण्यासाठींच क्रियापदाचें कर्तरि रूप बदलून त्याचें कर्मणि रूप करावें लागतें. अशा रीतीनें मराठीमध्यें निरनिराळ्या काळांचीं रूपें करितांना क्रियापदाचें रूप अगत्याचें कर्त्याप्रमाणें चालणारें, अगर नित्य नपुंसकलिंगी एकवचनी असणारें असें जें होतें त्यासच कर्तरि प्रयोग, कर्मणि प्रयोग व भावे प्रयोग अशा संज्ञा मराठी व्याकरणकारांनीं प्रारंभापासून दिल्या आहेत. तेव्हां संस्कृतांतील कर्मणि प्रयोग किंवा इंग्रजींतील Passive Voice म्हणजे मराठींतील 'कर्मणि प्रयोग' नव्हे ही गोष्ट या बाबतींत ठाम लक्षांत ठेवली पाहिजे. मराठींतील 'प्रयोग' हे इंग्रजींतल्याप्रमाणें क्रियापदाच्या रूपांत बदल करणारें एक अलाहिदा कारण कां मानितां येत नाहीं हें वरील विवेचनावरून दिसून येईल. यावरून मराठींत 'प्रयोग' मानण्याची बिलकुल जरूरी नाहीं असें मात्र होत नाहीं. निरनिराळ्या काळांमध्यें क्रियापदांचीं कर्त्यास अनुसरून, कर्मास अनुसरून वा स्वतंत्र अशीं जीं रूपें होतात त्यांचें पूर्ण स्वरूपकथन करण्याकरितां

म्हणून (क्रियापदाच्या कर्मांत बदल करणारें म्हणून नव्हे) प्रयोग हें सदर मानण्याची मराठींत जरूरी आहे. व त्याप्रमाणें तें व्याकरणकारांनीं मानलें आहे यांत कांहींहि गैर झालें नाहीं.

परंतु इंग्रजींतल्या (passive voice) शीं किंवा संस्कृतांतील 'कर्मणिप्रयोगा' शीं समकक्ष अशी रचना मराठींत नाहींच कीं काय असा प्रश्न यापुढें उत्पन्न होतो. अलबत् मराठींत अशा तऱ्हेची रचना असून तिचा प्रयोगहि सररास केला जातो ही गोष्ट थोडा विचार केला असतां सर्वांच्या लक्षांत येणारी आहे. ( Work is done by him )' या इंग्रजींतील खऱ्या कर्मणीचें ( Passive construction चें ) भाषांतर करावयाचें झाल्यास 'त्याच्याकडून काम केलें जातें' असें आपण करूं शकतों किंवा, 'त्याच्याकडून काम करण्यांत येतें' अशी ही रचना करण्याचा प्रघात पुष्कळ आढळतो. इंग्रजींतील ( passive voice ) शीं व संस्कृतांतील कर्मणीशीं समकक्ष असा हाच खरा कर्मणि प्रयोग होय. कोणत्याहि काळामध्यें वक्त्याच्या मर्जीस अनुसरून नेहमींच्या कर्तृप्रधान रूपाऐवजीं अशा तऱ्हेचें कर्मप्रधान रूप करितां येतें. उदाहरणार्थ, मराठींत स्वतंत्र असे जे सात काळ वैयाकरणांनीं मानिले आहेत त्यांचीं कर्मप्रधान रूपें पुढें दिल्याप्रमाणें होतात.

| कर्तृत्वप्रधान | | कर्मप्रधान | | |
|---|---|---|---|---|
| १ तो काम करितो | ........ | त्याच्याकडून काम केलें जातें | अथवा | करण्यांत येतें. |
| २ तो काम करितो | ........ | ,, | ,, | ,, |
| ३ त्यानें काम केलें | ........ | त्याच्याकडून काम केलें गेलें | अ० | करण्यांत आलें. |
| ४ त्यानें काम करावें | ........ | त्याच्याकडून काम केलें जावें | अ० | करण्यांत यावें. |
| ५ तो काम करी | ........ | त्याच्याकडून काम केलें जाई | अ० | करण्यांत येई. |
| ६ तो काम करो | ........ | त्याच्याकडून काम केलें जावो | अ० | करण्यांत येवो. |
| ७ तो काम करील | ........ | त्याच्याकडून काम केलें जाईल | अ० | करण्यांत येईल. |

अशाच रीतीनें सर्व क्रियापदांचीं रूपें होऊं शकतात. येवढेंच कीं, अकर्मक क्रियापदांचीं अशा तऱ्हेचीं रूपें करून वापरण्याचा प्रसंगच येत नसल्यामुळें तशीं रूपें करण्याचा प्रघात भाषेंत आढळत नाहीं. 'सरकाराकडून ही गोष्ट जाहीर केली जाईल किंवा करण्यांत येईल,' असे प्रयोग जसे आपण करतों तसे 'त्याच्याकडून बसलें जाईल' असे अकर्मक क्रियापदांचें प्रयोग करण्याची भाषेंत पद्धत नाहीं. बाकी सर्व सकर्मक क्रियापदांचे सर्व काळीं असे प्रयोग होतात याविषयीं शंका घेण्यास जागा नाहीं.

आतां, या प्रयोगांची वासलात आजपर्यंतच्या व्याकरणकारांनीं कशी लावली आहे व ती खरोखर कशी लावावयास पाहिजे या दोन गोष्टी पाहण्याच्या उरल्या.

दादोबांच्या व्याकरणांत 'जा' धातूला सहाय क्रियापदांच्या मालिकेंत गोवलेलें आहे. जा धातु पुढें लागून होणाऱ्या 'केलें जाईल,' 'मारिला जातो' १० प्रयोगांचा

विचार त्यांनीं आपल्या सहाय धातूंवरील प्रकरणांतच केला असून अशा प्रयोगांस तेथें 'कर्मकर्तरि' असें नांव त्यांनीं दिलें आहे. परंतु मराठी भाषेंत सर्व सकर्मक धातूंवरून हा 'जा' धातु प्रयोजून कर्मकर्तरि होत नाहीं' व ही मराठी भाषेंतील मोठी अडचणीची गोष्ट आहे' अशी मराठी भाषेविरुद्ध आपली तक्रार त्यांनीं नमूद केली आहे. कृष्णशास्त्री गोडबोले यांनीं बहुतांशीं दादोबांचाच पंथ अनुसरला असून सहाय धातूंच्या प्रकरणांतच उपर्युक्त प्रयोगांचें विवेचन केलें आहे; तथापि त्यांनीं 'धरली जाते' 'लिहिलें जावें' या उदाहरणांतील **प्रयोगास** कर्मकर्तरि**प्रयोग** असें नांव न देतां या क्रियापदांसच कर्मकर्तरि क्रियापदें असें म्हटलें आहे. गोडबोलेशास्त्रीबोवांनीं दोनतीन गोष्टी कबूल केल्या आहेत त्या मात्र लक्षांत ठेवण्याजोग्या आहेत व त्यांवरून दादोबांच्या उपर्युक्त तक्रारीचें परस्पर निरसन होण्याजोगें आहे. सर्व सकर्मक धातूंवरून हीं कर्मकर्तरि क्रियापदें तयार होऊं शकतात ही गोष्ट त्यांनीं अप्रत्यक्ष रीतीनें मान्य केली आहे, इतकेंच नव्हे तर 'मी सांपडलों गेलों', 'ते लढाईंत मेले गेले' इ० अकर्मक धातूंवरून झालेले प्रयोग कधीं कधीं येतात ही गोष्टहि त्यांनीं कबूल केली आहे. मात्र 'ते (अकर्मक क्रियापदांवरून झालेले) प्रयोग चुकीचे म्हणजे अशुद्ध समजले पाहिजेत' असा शेरा त्यांनीं तेथें मारला आहे. कृष्णशास्त्री चिपळूणकरांनीं या बाबतीकडे विशेषसें लक्ष पुरविलेलें दिसत नाहीं. रा. भि. जोशी यांनीं आपल्या व्याकरणांत 'क्रियापदांची व्यवस्था' या प्रकरणामध्यें सर्व संयुक्त क्रियापदांना एकत्र आणून त्यांचा एक गठ्ठा केला आहे; व सध्यां आपल्या विवेचनाचा विषय झालेल्या 'धरिला गेला' 'पकडला गेला' इ. क्रियापदांना 'कर्मणि संयुक्त क्रियापदें' असें नांव देऊन त्या गठ्ठयांतच एके ठिकाणीं कोंबून टाकलें आहे. मोरोपंत दामले यांनीं या बाबतींत अगदींच निराळा मार्ग स्वीकारिला आहे. 'त्याच्याकडून काम केलें गेलें' हा जो मराठींतील प्रयोग आहे तो The work was done by him या इंग्रजींतील किंवा 'तेन कर्म अक्रियत' या संस्कृतांतील खऱ्या कर्मणि प्रयोगास हुबेहुब जाब देणारा आहे ही गोष्ट पूर्वीच्या व्याकरणकारांच्या अगदींच लक्षांत आली नव्हती असें नाहीं. परंतु त्या गोष्टीचें महत्त्व नीट लक्षांत घेऊन त्या प्रयोगाच्या कर्मणि स्वरूपानुसार त्याची व्यवस्था मराठींत लावण्याचा यत्न दामले यांनीं प्रथम केला. पूर्वींपासून दादोबाप्रभृति व्याकरणकार 'त्यानें काम केलें' 'त्यानें काम करावें' या प्रयोगास कर्मणि प्रयोग म्हणत आले आहेत; व ही त्यांनीं केलेली व्यवस्था तर दामल्यांना टाकावयाची नव्हती. तेव्हां त्यांनीं दोन्ही डगरींवर हात ठेवण्याचा एक नवीनच उपक्रम केला. 'कर्मणि प्रयोगा'चे त्यांनीं दोन प्रकार कल्पिले. एक 'प्रधानकर्तृक' कर्मणि व दुसरा 'गौणकर्तृक' कर्मणि. He did the work किंवा He should do the work या वाक्यांमध्यें कर्ता जितका प्रधान आहे तितकाच तो 'त्यानें काम केलें' अथवा 'त्यानें काम करावें' या वाक्यांमध्यें प्रधान आहे ही गोष्ट लक्षांत घेऊन अशा तऱ्हेच्या योगांस त्यांनीं 'प्रधानकर्तृक कर्मणि' असें नांव दिलें, आणि ज्यामध्यें कर्ता अप्रधान असून

कर्मास प्राधान्य असतें अशा संस्कृतांतील व इंग्रजींतील कर्मणि प्रयोगाशीं समकक्ष असलेला जो 'त्याच्याकडून काम केलें जातें' अशा तऱ्हेचा प्रयोग, त्यास 'गौणकर्तृक कर्मणि' असें त्यांनीं नांव दिलें. या संबंधांत एक विशेष महत्त्वाची गोष्ट नजरेस आणण्याचें श्रेयहि दामले यांस देणें जरूर आहे. दामल्यांच्या पूर्वीपर्यंत 'केलें जातें' 'मारिला जातो' वगैरे खऱ्या कर्मणि स्वरूपाचे एकाच तऱ्हेचे प्रयोग व्याकरणकारांच्या लक्षांत आलेले होते. परंतु अशाच अर्थाचे व स्वरूपाचे प्रयोग दुसऱ्या एका तऱ्हेनेंहि मराठींत केले जातात ही गोष्ट दामले यांनीं उघडकीस आणिली आहे. 'त्याच्याकडून काम करण्यांत येतें,' 'सरकाराकडून असें जाहीर करण्यांत आलें' इत्यादि उदाहरणांमध्यें दिसून येणारी ही ती दुसरी तऱ्हा होय. हिलाहि 'गौणकर्तृक कर्मणि' असेंच नांव दामल्यांनीं दिलें आहे.

येथवर पूर्वसूरींनीं या बाबतींत काय काय व्यवस्था केलेल्या आहेत हें आपण पाहिलें. आतां त्या कितपत समाधानकारक आहेत हें पाहूं. पैकीं या प्रयोगास 'कर्मकर्तरि' हें नांव देण्याची दादोबांची व कृष्णशास्त्री गोडबोल्यांची व्यवस्था अगदींच असमाधानकारक होय हें सहज लक्षांत येणारें आहे. पुढच्या कोणच्याहि व्याकरणकारांना ती मान्य झाली नाहीं हाच ती चांगली नसल्याचा बळकट पुरावा होय. शिवाय ही योजना स्वीकारणारे कृष्णशास्त्री गोडबोले यांनींच 'कर्मकर्तरि ह्यांत वस्तुतः कर्मास कर्तृत्व येत नाहीं, म्हणजे कर्मपद आणि कर्तृपद हीं एकच होत नाहींत, म्हणून ही संज्ञा बरोबर नाहीं. तथापि ह्यास कर्मणि म्हणणें हेंहि सर्वांशीं बरोबर दिसत नाहीं, म्हणून तूर्त कर्मकर्तरि हीच संज्ञा दिली आहे.' असे अरुचिदर्शक उद्गार तिजविषयीं काढले असल्यामुळें तिचें अधिक खंडन करण्याची कांहीं आवश्यकता राहिलेली नाहीं. संस्कृत व्याकरणांत 'ओदनः पचति' यासारख्या प्रयोगांस कर्मकर्तरि म्हणण्यांत येतें; तशासारखा हा प्रयोग नसून 'तेन कर्म क्रियते' या कर्मणि प्रयोगाच्या अर्थाचा हा मराठींत प्रयोग आहे हें वर स्पष्ट केलेंच आहे. तेव्हां यास 'कर्मकर्तरि' म्हणणें प्रशस्त होणार नाहीं.

जोशांनीं या बाबतींत केलेली व्यवस्था ही खरोखर व्यवस्थाच नव्हे. सहायक्रियापद लागून होणाऱ्या सर्व क्रियापदाच्या रूपांस एका दावणींत गोवून त्यांचा एक गठ्ठा करणें व 'इंग्रजी प्रमाणें काळांचे पोटभेद मानावयाचेच झाले, तर ते पुढील प्रमाणें मानावे' असें म्हणून इतर व्याकरणकारांनीं दिलेल्या संज्ञांचा आपल्या व्याकरणांत मागल्या दारानें शिरकाव करून देणें ही कांहीं शास्त्र लिहिण्याची पद्धत नव्हे ! सर्वच ठिकाणीं जोशांनीं अशी धरसोड करून आपलें व्याकरण सरळ मनाच्या वाचकास त्रास उत्पन्न करणारें असें करून ठेविलें आहे. आतां शेवटची म्हणजे दामल्यांची योजना. यांच्या योजनेंतील मोठा दोष हाच कीं गौणकर्तृक व प्रधानकर्तृक अशीं नावें देऊन जे दोन प्रकार त्यांनीं 'कर्मणि प्रयोगां' त गोवले आहेत ते समकक्ष व एकाच दर्जाचे असे नाहींत. 'त्यानें काम केलें' हा He did the work या वाक्यांतल्याप्रमाणें

अर्थाच्या दृष्टीनें खराखुरा कर्तरि प्रयोगच होय. त्यांतील 'केलें' हें क्रियापद संस्कृतांतील कर्मणि कृदन्त विशेषणावरून आलें असल्यामुळें तें कर्माच्या लिंगवचनांप्रमाणें बदलतें, म्हणून त्यास आपण कर्मणि म्हणतों येवढेंच. याच्या उलट 'केलें जातें' हा खराखुरा कर्मणि अर्थाचा प्रयोग होय हें वर अनेकवार स्पष्ट केलेंच आहे. या दोन्ही प्रयोगांची जाति परस्परांहून अगदीं भिन्न आहे हें आणखी एका गोष्टीवरून स्पष्ट होतें. 'तो काम करितो' या कर्तृप्रधान वाक्याचा ज्याप्रमाणें 'त्याच्याकडून काम केलें जातें' असा कर्मप्रधान प्रयोग होतो त्याच प्रमाणें 'त्यानें काम केलें' याचाहि 'त्याच्याकडून काम केलें गेलें' असा कर्मप्रधान प्रयोग करितां येतो हें वर स्पष्ट केलेंच आहे. आतां यांत पहिल्या वर्तमानकाळाच्या उदाहरणांत कर्तरिप्रयोगावरून कर्मणि केला असें म्हणतां येतें व तें ठीकच आहे; परंतु दुसऱ्या भूतकाळाच्या उदाहरणांत कर्मणि प्रयोगावरून कर्मणि केला असें म्हणावें लागतें, व तें फार चमत्कारिक दिसतें हें उघड आहे. यांपैकीं एकास प्रधानकर्तृक व एकास गौणकर्तृक म्हटल्यानें त्यांतील चमत्कारिकपणा नाहींसा होतो असें नाहीं. वास्तविक पाहिलें असतां सध्यां ज्यास आपण सामान्यतः कर्मणि प्रयोग म्हणतों तो कांहीं विशिष्ट काळांच्या रूपांबरोबर अपरिहार्यतेनें येणारा व वाक्याचें कर्तृप्रधान स्वरूप न बदलणारा असा क्रियापदाच्या रूपाचा प्रकार होय. आणि 'केलें जातें' 'करण्यांत येतें' हा सर्व काळांमध्यें वक्त्याच्या मर्जीनुरूप होणारा व वाक्याचें कर्तृप्रधान स्वरूप बदलून कर्मप्रधान करणारा असा एक अगदीं निराळाच प्रकार होय. अशा रीतीनें क्रियापदाच्या विकरणाचे हे अगदीं भिन्न प्रकार असल्यामुळें त्यांस अगदीं भिन्न नांवें देणें हेंच योग्य आहे.

हिंदी भाषेमध्यें मराठींतल्याप्रमाणेंच क्रियापदाच्या रूपांचे प्रकार होतात. म्हणजे त्या भाषेंतहि भूतकाळीं क्रियापदाचें रूप कर्माप्रमाणें चालणारेंच होतें. उदाहरणार्थ—'रामानें संकल्प केला—प्रतिज्ञा केली' याचें भाषांतर हिंदींत 'रामनें संकल्प किया—प्रतिज्ञा की' असें होतें. त्याचप्रमाणें 'केलें जातें,' 'मारिला जातो' ही जी मराठींतील कर्मप्रधान रचना ती, हुबेहूब तशीच, हिंदींतहि आहे; उदा०—'कपडा शिवला जातो. 'कपड़ा सिया जाता है,' 'चिठी पाठविली गेली'—'चिट्ठी भेजी गई' इ. परंतु हिंदीचे व्याकरणकार नसता गोंधळ माजविणारे नसल्यानें त्यांनीं या दोन्ही प्रकारांची आपल्या व्याकरणांत सुरेख व्यवस्था लावून ठेविली आहे. क्रियापदांच्या रूपांत बदल करणारीं काल, पुरुष, वचन इ० जीं सर्वव्यापी कारणें त्यांस 'वाच्य' म्हणून त्यांनीं आणखी एक कारण मानलें आहे. वर आपण क्रियापदांचीं कर्तृप्रधान किंवा कर्मप्रधान रूपें पाहिलीं. या क्रियापदाच्या कर्तृप्रधानतेस किंवा भावप्रधानतेसच हिंदी व्याकरणांत 'वाच्य' असें म्हणतात. 'वाक्यामध्यें कर्त्याविषयीं विधान केलें आहे, कर्माविषयीं विधान केलें आहे किंवा केवळ भावाच्या विषयीं विधान केलें आहे हें क्रियेच्या ज्या रूपांतरावरून जाणलें जातें त्याला 'वाच्य' असें म्हणतात' अशी त्याची हिंदी व्याकरणांत व्याख्या केली आहे. या वाच्याचे कर्तृवाच्य, कर्मवाच्य आणि भाव

वाच्य असे तीन प्रकार सांगितलेले आहेत. 'ज्या क्रियेच्या रूपावरून क्रियेचा कर्ता हाच वाक्याचा उद्देश आहे असें कळून येतें, त्या क्रियेच्या रूपाच्या प्रकारास कर्तृवाच्य असें म्हणतात' या व्याख्येस अनुसरून, 'लड़का दौड़ता है—मुलगा दौड़तो,' 'लड़केने पुस्तक पढी—मुलानें पोथी वाचिली,' रानीनें सहेलियोंको बुलाया-राणीनें सखीला बोलाविलें' हीं सर्व उदाहरणें कर्तृवाच्याचीं गणलीं जातात. त्याचप्रमाणें 'कपडा सिया जाता है—कपडा शिवला जातो,' 'चिट्ठी भेजी गई—चिठी पाठविली गेली,' 'मुझसे यह बोझ न उठाया जायगा—माझ्याकडून हें ओझें उचलिलें जाणार नाहीं' हीं सर्व उदाहरणें कर्मवाच्याचीं ठरतात व 'यहां कैसे बैठा जायगा—येथें कसें बसलें जाईल' इ० उदाहरणें भाववाच्याचीं मानलीं जातात. हा भाववाच्याचा प्रयोग मराठींत स्वाभाविक वाटत नाहीं; कारण जवळ जवळ त्याच अर्थी 'बसवेल' वगैरे प्रयोग मराठींत होत असल्यामुळें 'बसलें जाईल' असें रूप करण्याचा बिलकुल प्रचार नाहीं. हिंदींत मात्र असे प्रयोग सररास होतात यास्तव ते त्या व्याकरणांत दिले आहेत.

याप्रमाणें हें 'वाच्या'चें सदर झालें. हेंच हिंदी व्याकरणामध्यें मराठीपेक्षां नवीन असें आहे. बाकी 'प्रयोग' हे त्यांत मराठीप्रमाणेंच मानिले आहेत. पूर्वी दिलेल्या उदाहरणांपैकींच—'लड़का दौड़ता है—मुलगा दौडतो,' 'लड़का पुस्तक पढ़ता है—मुलगा पुस्तक पढतो' हा कर्तरिप्रयोग, 'लड़केने पुस्तक पढ़ी—मुलानें पोथी वाचिली' हा कर्मणि प्रयोग 'रानीने सहेलियोंको बुलाया—राणीनें सखींना बोलाविलें' हा भावे प्रयोग, अशी सर्व मराठींतल्याप्रमाणेंच हिंदींतहि व्यवस्था आहे.

वरील विवरणावरून 'वाच्य' हें सदर एक नवीन निर्माण करून हिंदी व्याकरणकारांनीं क्रियापदाच्या सर्व रूपांची कशी सुरेख व्यवस्था लावली आहे हें सहज लक्षांत येईल. 'केलें जातें' वगैरे प्रयोगांची अगदीं निराळी व्यवस्था लावणें त्यांच्या स्वरूपावरून जरूरच होतें त्याप्रमाणें ती हिंदी वैयाकरणांनीं लावली आहे. वर दिलेल्या उदाहरणांवरून हें सहज लक्षांत येईल कीं कर्तृवाच्यामध्यें कर्तरि, कर्मणि व भावे हे तीन्ही प्रयोग येऊं शकतात. कर्मवाच्यामध्यें केवळ कर्मणि प्रयोगच होऊं शकतो. आणि भाववाच्य क्रियेचा नेहमीं भावे प्रयोगच होतो. कर्मवाच्यामध्यें अर्थातच क्रिया नेहमीं सकर्मक असते; व भाववाच्यामध्यें ती अकर्मक असते या गोष्टी सहज लक्षांत येण्याजोग्या आहेत. मराठीमध्यें कर्मवाच्याचे 'केलें जातें' व 'करण्यांत येतें' असे दोन प्रकारचे प्रयोग होतात. यांपैकीं पहिल्यास 'प्रथम कर्मवाच्य' व दुसऱ्यास 'द्वितीय कर्मवाच्य' म्हणावें. ही योजनाहि सहज करतां येण्याजोगी आहे.

एक दोन क्रियापदांचें या नवीन पद्धतीनें व्याकरण चालवून दाखविल्यास या पद्धतीचें अधिक स्पष्टीकरण होईल; यास्तव खालीं कांहीं क्रियापदांचें व्याकरण करून दाखविलें आहे.

'अहमदशहानें दिल्ली **घेतली** व दत्ताजी **मारला गेला** अशी बातमी दक्षिणेंत **पाठविण्यांत यावी**.'

(१) घेतली— सकर्मक क्रियापद; मूळ धातु 'घे'. कर्तृवाच्य, स्वार्थ, भूतकाळ तृतीयपुरुष, स्त्रीलिंग, एकवचन. हा कर्मणि प्रयोग; 'अहमदशहानें' हा कर्ता, 'दिल्ली' हें कर्म. (२) मारला गेला— सकर्मक क्रियापद; मूळ धातु 'मार'. प्रथम कर्मवाच्य, स्वार्थ, भूतकाळ, तृतीयपुरुष, पुंल्लिंग, एकवचन. हा कर्मणि प्रयोग, 'दत्ताजी' हें कर्म, कर्ता अनिर्दिष्ट. (३) पाठविण्यांत यावी— सकर्मक क्रियापद, मूळ धातु 'पाठव'. द्वितीय कर्मवाच्य, विध्यर्थ, तृतीयपुरुष, स्त्रीलिंग, एकवचन. हा कर्मणि प्रयोग 'बातमी' हें कर्म, कर्ता अनिर्दिष्ट.

याप्रमाणें मराठी व्याकरणांतील एका महत्त्वाच्या बाबतींतील वैगुण्याचें दिग्दर्शन करून त्या वैगुण्याचें निराकरण करण्याचा उपायहि वर सुचविला आहे. हिंदी व्याकरणांतील, 'वाच्य' हें क्रियापदाच्या विकरणाचें एक निराळें सदर मानण्याची योजना प्रस्तुत लेखकास फार उपयुक्त वाटली म्हणूनच त्यानें ती आपल्या महाराष्ट्र बांधवांपुढें मांडण्याचें धाडस केलें आहे. 'केलें जातें,' 'मारिला जातो' इ० प्रयोगांच्या संबंधानें आमच्या व्याकरणकारांनीं आतांपर्यंत माजविलेल्या गोंधळापेक्षां प्रस्तुतची हिंदी व्याकरणांतील योजना अनेक पटींनें शास्त्रशुद्ध व सुव्यवस्थित आहे. आतां हिंदी भाषेमध्यें 'किया जाता है,' 'बैठा जायगा,' अशा रीतीनें कर्मवाच्य अथवा भाववाच्य क्रिया वापरण्याचा जितका प्रघात आहे तितका मराठींत नाहीं हें खरें. तथापि मराठींतहि एकंदरीनें तसा प्रघात पुष्कळ आहे व तो दिवसानुदिवस वाढत जात आहे हें सूक्ष्म रीतीनें भाषेचा विकास अवलोकन करणाऱ्यांच्या सहज लक्षांत येईल. शिवाय एखादा प्रयोग भाषेंत अस्तित्वांत आहे ही गोष्ट सिद्ध असल्यावर, मग त्याचा प्रचार पुष्कळ असो वा थोडा असो, त्याचें महत्त्व पूर्णपणें लक्षांत घेऊन त्याची सुव्यवस्था लावणें हें व्याकरणकाराचें आद्य कर्तव्य आहे. तेव्हां प्रस्तुत लेखांत प्रतिपादिलेल्या गोष्टीकडे महाराष्ट्रीय वैयाकरणांचें लक्ष जाऊन ते त्यांचा स्वीकार करतील अशी आशा आहे.

आणखी पुष्कळच अनिर्णीत व व्याकरणकारांच्या मतभेदामुळें गुंतागुंतीचे बनलेले प्रश्न मराठी व्याकरणाच्या अभ्यासकांच्या नजरेस येतात. संयुक्त क्रियापदांचा प्रश्न हाहि अशाचपैकीं होय व त्याचा प्रस्तुत विषयाशीं थोडा बहुत संबंधहि पोंचतो. 'केलें जातें' 'करण्यांत येतें' हीं क्रियापदें एका अर्थानें संयुक्त क्रियापदांतच मोडतात. शिवाय हिंदी व्याकरणाचाहि त्या प्रश्नावर कदाचित् थोडाबहुत प्रकाश पाडतां येईल. तथापि या लेखांत आतांपर्यंत प्रतिपादिलेल्या विचारसरणीनेंच कित्येकांच्या रूढ कल्पनांस जोराचा धक्का बसण्याचा संभव असल्यानें त्या धक्क्यांतून सावरून मूळ पदावर येण्यास त्यांस बराचसा अवकाश देणें जरूर आहे. सर्वांचीं मनें स्थिरस्थावर होऊन या लेखांत विवेचिलेल्या प्रश्नांवर निर्विकार मनानें यथास्थित चर्चा झाल्यावर (व शक्य असल्यास त्यांचा कांहींतरी निर्णय झाल्यावर) मग इतर प्रश्नांच्या संबंधानें पाहूं.

---

# राजापूरप्रान्तीय कुळंब्यांच्या बोलींतील विशेष शब्द

( लेखकः– कृ. गो. साठे )

कुळंबी शब्द — तद्बोधक महाराष्ट्रीय शब्द किंवा स्पष्टीकरण

अगत [न०] अगत्य, काळजी

अद्रून [क्रि० वि०] १ मुद्दाम, समजून उमजून, हटकून २ अवश्य

अवस्तुत [क्रि० वि०] अकस्मात्, एकाएकीं

आऊस [स्त्री०] आई

आवशी [आवशी] } [स्त्री० सामान्यरूप किंवा संबुद्धि] } आई

आगोट [स्त्री०] उन्हाळा

आगोटीं उन्हाळीं

आटो [पु०] फेरा [दोरी वगैरेचा]

आद्वो [वि०] पहिल्यानें आलेला-पाहिलेला असा; अपरिचित

आपड } आपाड } [स्त्री०] शिवाशिव

आपड [क्रि०] शीव, स्पर्श कर

आप्डीची [वि०] १ शिवाशीव झालेली २ विटाळशी

आयदण } आयदाण } [न०] सांटवण्याचें साधन [भांडें, टोपली, गोण वगैरे.]

आयपूत [पु०] दत्तक घेतलेला

आरावलो [क्रि०] निजला [हात पाय ताणून] [निंदाव्यंजक]

आवडलें } आवाडलें } [क्रि०] कुल्ले धुतले [शौचविधि केला]

आस्ते [क्रि० वि०] हळू, सावकाश

इक्तो [स. ना.] इतका

इगुत } विगुत } [स्त्री.] युक्ति

इयोंक [क्रि. वि.] विण्यास

इराकत } विराकत } [स्त्री.] लवची

इलञ् [क्रि.] आलों—ल्यें

इवाय [पु.] व्याही

इस्तारी } विस्तारी } [स्त्री.] पत्रावळ

उडी [स्त्री.] दुसऱ्याचा बैल कामाकरितां आणिल्याबद्दल एका हंगामाचें द्यावयाचें मूल्य

उजवारलो [क्रि.] विकार नाहींसा होऊन शक्ति आली. बरा झाला

उप्सो [पु.] उपसा, आंतलें बाहेर काढणें

उबावलें [क्रि.] उकडलें

उलपो [पु.] लग्न वगैरेच्या आरंभीं देव, ब्राह्मण किंवा मानकरी ह्यांस द्यावयाचा शिधा वगैरे [बहुधा तांदूळ, नारळ व विडा]

उस्तवारी [स्त्री.] व्यवस्था, निगेत

ओडण्यो [स्त्री. अने. वच.] कळा, वेग

ओप [स्त्री.] कोवळें ऊन

ओपेक कोवळ्या उन्हांत

अंदू } अँवदां } [क्रि. अ.] यंदा, चालू सालीं

उचापत [स्त्री.] १ उसनवार, उधार आणणें. कर्ज आणणें वगैरे देवघेवीचे व्यवहार

कबिलो [पु.] मुलें, माणसें, गुरें, सामान वगैरे परिवार

कय [क्रि. अ.] कधीं, केव्हां

कल [क्रि. अ.] काल

कशी [स्त्री.] बारीक कणीस

कश्यो [स्त्री. अने. वच.] बारीक कणसें

काकलो [पु.] मावशीचा नवरा

कापड [न.] लुगडें

कांबरूण [न.] पांघरूण

कांष्टी [स्त्री.] कांस, लंगोटी

कित्या [अ.] कां

किल्याक [अ.] कशाला
किरच (चा)ण } [स्त्री.] चुरा, [वाजवीपेक्षां वारीक]
किरपाण [वि.] वारीक, कृश
कुपराण [न.] कुभांड, आळ, वालंट
कुरप(पा)ण [न.] लहान टोपली
कुरापत [स्त्री.] कळ, खोडी
कोलवो [पु.] कुजलेलें गवत[घरावरील]
कंवत्ती [स्त्री.] मस्ती [निंदाव्यंजक]
खजाळी (स्त्री.) कुरापत
खजाळो [वि.] खोड्या करणारा
खड [पु.] गुरांचें खाणें [गवत, पेंड वगैरे.]
खमाद [क्रि. भवि.] राहील, टिकेल
खरडो [पु.] वारीक रान (टाकळा वगैरे.)
खवाटां [न. अने. वच.] गालफडें, कानशिलें वगैरे भाग [वहुधा कृशतेला अनुलक्षून]
खँञ् [अ.] कोठें
खँञ्चो [वि.] कोठला
खँञ्सर (अ.) कोठपर्यंत
खँञ्सून [अ.] कोठून
खंडलें (क्रि.) देऊन टाकलें, फेडलें (कर्ज)
खय ( पु. ) क्षय ( विकार )
खाजें ( न. ) कुटी
खात [ न. ] मळ, कुसका गाळ
खाव(वा)ड ( स्त्री. ) खरड, खरडपट्टी
खिमाट ( न. ) घणसर पेज, कढी, आमटी वगैरे
खिस्ती ( स्त्री. ) हस्तेवंदी
खुवाट ( न. ) खुबे, कमर
खुसपाट ( न. ) कळ, खोडी, कुरापत
खेंकासता } खेंसता } ( क्रि. ) ओरडतो ( रागावेशानें दुसऱ्यावर )
गवलो } गवसलो } ( क्रि. ) १ सांपडला २ झपाटला (भुतादिकांच्या सपाट्यांत)
गावता ( क्रि. ) सांपडतो
गाळ ( स्त्री. ) शिवी
गांवठो ( पु. वि.) ज्ञातीचा मुख्य (गावांतील)
गांवधे ( क्रि. वि. ) परगांवीं, ग्रामान्तरीं
गिमवस ( स्त्री. वि. ) उन्हाळी उत्पन्न; उन्हाळीं होणारे
गिलाण्यो ( स्त्री. अने. वच. ) विनंत्या, आर्जवें
गीम ( पु. ) उन्हाळा ( पावसाळ्यानंतरचा काळ )
गुदव ( क्रि. ) तुडव
गुदारलो ( क्रि. ) अडकला, तुडवला गेला
गोतपत ( स्त्री. ) ज्ञातींतील दोषासंबंधानें ज्ञातीची सभा
गोयलो ( पु. ) मोळी ( आखूड भारी )
गोवीं ( न. अने. व. ) गुरें
घवाड ( न. ) मोटी प्राप्ति
घरण ( स्त्री. ) गृहिणी ( घरांतील व्यवस्था व स्वयंपाक करणारी मुख्य बायको )
घी ( क्रि. ) घे
घेवासें ( क्रि. वि. ) घेतां येण्यासारखें
घोटें [न.] गुरांस औषध पाजण्याचें नळकंडें
घोडशी ( स्त्री. ) घडवंची
घोणाटता ( क्रि. ) निचेष्ट होतो. कासावीस होतो. घायाळ पडतो
घोव ( पु. ) नवरा
घोळणी ( स्त्री. ) प्रदर, धुपणी
चकरी ( स्त्री. ) घेरी
चकाट } चट } ( स्त्री. ) चटक
चटावलो [ क्रि. ] सवकला
चँवसून [ क्रि. वि. ] चोहोंकडून, सर्व प्रकारें
चापती [ स्त्री. ] तरफ
चाय [स्त्री.] चहा; अर्थ, उपयोग, मातब्बरी
चावी [ स्त्री.] १ किल्ली. २ खुबी
चुकोट [वि.] चांगलें
चेढूं [न.] मुलगी
चोपाटलो (क्रि.) थकला, कृश झाला
चोपाडलें [क्रि.] फासलें, चुळबुळींत लावलें (तेल वगैरे)
जतनाव [क्रि.] जपून जमवून ठेव. जप

३५४
३६०

जतो } [पु.] लग्नसंबंधी वधूचें कापड वगैरे
जथो } साहित्य
जर [पु.] ताप
जरेता [क्रि.] ताप येतो
जरेलो [क्रि.] ताप आ.ा
जाप [पु.]देवाजवळ सांगणें
जाप्साल [पु.] जबाब. फाजिलपणानें उत्तर
जिनगानी [स्त्री.] १ जिंदगी. २ तरणोपाय ३ जिवंत राहणें
जुगव [क्रि.] जुळव, एकवाक्यता कर
जुगवलान् [क्रि.] (त्यानें) जुळविलें
जुगवीद [क्रि.] जुळवील
जुगाद [क्रि.] जुळेल.
जोकाड [न.] १ जूं. २ जबाबदारी.
जोगावता [क्रि.] चुकवतो; चुकवाचुकव करितो
जोवलें [क्रि.] वीज चकमकली
जोस [पु.] जोम, जोर
झाडो [पु.] १ शौच, परसाकडे. २ बारकाईनें शोध. ३ पूर्णता, खात्रीचा निश्चितपणा
झिलगो [पु.] मुलगा
झील [पु.] पुत्र
झुलवता हा [क्रि.] फसवतो आहे
झेम [स्त्री.] डुलकी
झोंबाट [न.] झोंबी
झोरो [वि.] फार कृशता, जर्जर
टाळें [न.] कुलूप
टेपराण } [न.] निमित्त, जबाबदारी
टेपार }
टेळ्यो [वि.] टेहेळणी करणारा
टोणो [पु.] १ ठणका. २ फार मोठा उंचवटा. ३ भडाणी, मूर्ख
ठाय [पु.] एकाचें पूर्ण जेवण होयसें वाढलेलें पान
ठावकें [न.] भांडें.
ठेपी [क्रि. वि.] मध्यें इकडे तिकडे न जातां सरळ (इष्ट स्थळीं)
ठेंबो } [पु.] थेंब
ठिंबो }
डगर [स्त्री.] दरड
डगूळ (न.) मोठा फणस
ढांप (क्रि.) झांक
ढांस (स्त्री.) खोकला
ढाळ (पु.) जुलाब, रेच
ढेप्शी (स्त्री.) } तुकडा (फणसाचा केलेला
ढेपूस (न.) } लांबट तुकडा)
ढोपार (न.) गुढगा
ता [अ.] तर
तागरे (पु. अने. वच.) मोठया कळा, वेग
तान् (अ.) पर्यंत, पावेतों
तांतड (स्त्री.) फार घाई, त्वरा
तिकाट (न.) [वि.] तिखट
तिवडो (पु.) मळणीचा खांब
तीख (न.) तिखट (रुचि)
तुकां (स.) तुला
तुमकां (स. तुम्हांला
तेकां (स.) त्याला, तिला
तेणें--नें (स.) त्यानें
तेंतू } (स.) त्यांत
तेंतूर }
तोकडें (वि.) आखूड, अपुरें
थरासन (न.) स्थिरता, टिकाव
थावटलें (क्रि.) निवांत झालें, निवांत केलें राहिलें, आटोपलें.
थावरलें (क्रि.) राहिलें, स्थिरावलें, थोपवलें
थॅञ् (अ.) तेथें
थॅञ्सर (अ.) तेथपर्यंत
थॅञ्सून (अ.) तेथून
दत (पु.) जन्त
दांवट (क्रि.) पिटाळ
दिलान (क्रि.) (त्यानें) दिलें
दी (क्रि.) दे
दी } (पु.) दिवस
दीस }
देज (न.) लग्नसंबंधी वधूकडे द्यावयाची देणगी
धकटो } (वि.) लहान, कनिष्ठ
धकलो }
धाप (स्त्री.) दमा
धाबें (न.) छाती (निरुत्साह दर्शक)

धाम (स्त्री.) सांथ
धार (स्त्री). डोंगराची अगदीं उंच कडा
धारो (पु.) परिपाठ, चाल
धुकाट (पु.) धूर
धुवडी (स्त्री.) पुतणी
धेडो (पु.) वराच्या संगतीं राहणारा मनुष्य.
धेन (न.) ध्यान, चित्त, लक्ष.
नडणी (स्त्री.) बेणणी.
नय (स्त्री.) नदी
नावरस (स्त्री.) जोशाकडे जाऊन बालजन्मकाळावरून नांव ठरविणें, वधूवरांच्या नांवांवरून त्यांचें कूट जमविणें, वगैरे विधि.
निगूत (अ.) नुक्ता
निसण (स्त्री.)शिडी
निसत्याक (न.) कालवणास
न्यार } (वि.) निराळें.
न्ह्यार } (क्रि. वि.)
न्ही (क्रि.) ने
परतावण (स्त्री.) वरात
परबावलो (क्रि.) दिसला
परमेस्र (पु.) परमेश्वर
परावो (वि.) परकी, परस्थ
पार्डे } (अ०) पेक्षां
परस }
पायरव (पु०) चाहूल
पायरावलो (क्रि०) दिसला, आढळला.
पाँय् (अ०) मुळें (उ० झिलापाँय् मी न्हवलों= मुलग्यामुळें राहिलों,)
पार (पु०) १ प्रहर २ नदींतून उतार ( भिजल्याशिवाय ) ३ पलीकडे.
पारय ( स्त्री०) पाहार.
पारो (पु०) १ लहान फणस. २ पहारा—रक्षणाच्या पाळीचा काळ.
पास (अ०) पाशीं, जवळ.
पासल ( स्त्री०) आडवें होणें—निजणें.
पिरतुम (स्त्री०) पृथ्वी.
पुरवलें (क्रि०) पतकरलें, परवडलें.
पुंजाव [क्रि०] जमव—गोळा कर.
पेगाम (पु०) प्रयत्न.

पेलकाट (न०) संकट.
पैक (क्रि०) थांब, रहा.
पैको (पु०) पैसा.
पोटाशी (वि०) गर्भार.
फळो (पु०) झोपाळा
फाडयो [पु०] पंचा
फाम ( पु० स्त्री०) स्मरण, शुद्धि
फिटलें (क्रि०) १ सरलें ( अशौच ) २ देऊन झालें (कर्ज) ३ सुटलें (नेसण)
फुटणावळ ( स्त्री० ) एक वर्षपर्यंत झाडाचें उत्पन्न ( फळें व० ) घेण्याबद्दल द्यावयाचें द्रव्य.
फुडो (पु०) पुढला भाग
फुसाकलें (क्रि०) १ सुटलें ( बंद सुटले किंवा सैल झाले ) २ फिसकटलें, बिघडलें
फूट (स्त्री०) १ धुमारे (नवे नवे कोंब) (वि०) २ एक वर्ष फळें घेण्याच्या करारानें पतकरलेलें (झाड)
फेडलें ( फीट ह्या क्रि. चें प्रयोजक रूप) १ शुद्धि केली ( अशौ०) २ देऊन टाकलें (कर्ज) ३ सोडलें (वस्त्र)
फोकर } (न०) पोकळ
—का— } (वि०)
फोव (पु०) पोहे
फोस } (वि०) कमकुवत, दुर्बळ, निरुपयोगी.
फोसकट }
—का— }
वगर (अ०) विना, शिवाय
बलगाट (न०) बालंट, किचाट
बाप्यो (पु० वि०) मोठा (पुरुष)
बाय (स्त्री.) आई
बारगाळलो (क्रि.) उनाड झाला.
बारखुंडो (वि.) उनाड
बासगां ( न. अने. वच.) बाशिंगें
बास्कळ (वि.) चावट, वात्रट
बिन (अ.) खेरीज, शिवाय
बिर्जूमाल (वि.) समाईक
वेगीन } (अ.) लवकर
वेगून }



बोकाळता (क्रि.) उनाडतो
बोवलें (न.) कोनाडा
भागलो (क्रि.) दमला, थकला.
भावकी (स्त्री.) १ समाइकांत हिस्सा. २ एका कूटांतला हें नातें
भावलो (वि.) भाऊबंद
भावो (पु.) मेहुणा
भांगो (पु.) जमिनीचा लहान तुकडा
भिर्डे (न.) १ दोहोंच्या फटीमध्यें घट्ट बसवायाचा तुकडा [ विशेषतः दगडी बांधकामांत] २ मोठा जमाव
भितूर } (अ.) आंत
भुतूर }
भीस (स्त्री.) १ दाट केस २ संबंध नसलेली निरनिराळीं अनेक माणसें, जेवणखाण, निजणें बसणें एका ठिकाणीं करतात ती स्थिति ३ खातरी, विश्वास.
भेस ( स्त्री.) फांक, तुकडा
भोकाड (न.) } जबडा ( निंदाव्यंजक )
भोकाडो (पु.) }
भोवाडो (पु.] वळसा ( वाकडे तिकडे पुष्कळ चालावें लागणें)
भोसाकलें (क्रि.) सैल झालें, निसटलें, सुटलें, फाटलें.
भेडसावलान् (क्रि.) (कोणीतरी) भिवविलें.
मगतून (अ.) पुनः, फिरून
मग्ये (अ.) मग
मजवेलो (वि.) मधला
मनुक्श (पु.) मनुष्य
मरतुकडो (वि.) अजारी
मर्यो (वि.) अशक्त, झुरूमुरू
माकां } (स.) मला
माज }
माणूस (न.) १ वायको-पत्नी २ मनुष्य.
मिर्यो (न.) मिरच्या
मुगदार (वि.) मुखत्यार
मेर-रा ( स्त्री. ) बांधोळी
मोप (वि.) पुष्कळ.
मोवाळी (स्त्री.) लोणी
मोवाळलो (क्रि.) १ नरमला २ भुलला
मोस (पु.) १ सुगावा २ संशय (आरोप)
म्होरकाडी } (वि.) पुढारी, मुख्य
म्होरको }
म्होरे (अ.) १ पुढें २ समोर
याक (वि.) एक
याद (स्त्री.) आठवण
याम (पु.) व्यायाम, मेहनत
रांदाप (न.) सैंपाक
रिवाड (न.) चिखल
रेंच ( पु.) १ पुष्कळ मारणें, ठेचणें, वगैरे २ अपचन नाशाचा एक तोडगा (मडक्यांत निखारे, त्यांवर मीठ मोहोरी, मिर्चा व बारीक खडे टाकून विकारी माणसाच्या पुढून व मागून तें मडकें वरून खालीं उतरून परातींत उपडें ठेवून परातींत पाणी ओतावयाचें; कांहीं वेळानें पाणी मडक्यांत ओढलें जातें )
रेंगाळता (क्रि.) अति मंद काम करितो
रोस (पु.) राग, शेष
ऱ्होव (पु.) रहू, कोंब फुटलेलें धान्य
लट (स्त्री.) लाट
लागसून ( अ.) पासून, कडून
लागीं (अ०) जवळ
लास (पु०) डाग
लिगाड (न०) लचांड, लटांबर
लोटी (स्त्री०) ओटी, ओसरी
लोटो (पु०) ओटा
वकाद } (न.) औषध
वशीद }
वग (स्त्री.) ओळख, सलोखा
वरसल (स्त्री.) वार्षिक पाळी
वर्गत (स्त्री.) वांटणी
वसदां ( न. अने. व. ) औषधें
वायर (क्रि.) पसर
वायपोय (स्त्री.) सांडलोट, नासधूस
वायलें (वि.) निराळें, वेगळें, विभक्त
वावर (पु.) कामधंदा
विक्ती (स्त्री.) युक्ति
विरड (स्त्री.) १ एक वेळ-दिनार्ध २ लाकडें

( मोठीं ) रचणें, व रचून ठेवण्याचा माच ३ गवत, सर्पण वगैरे लांब ठिकाणाहून शोधून आणण्याचें ( बहुधा एक वेळचें ) काम
वेचू (पु.) विंचू
वेज (न.) १ व्याज २ बारीक भोंक ( सुई, दाभण वगैरेंच्या भोकासारखें )
वांगड (पु.) } सोबत
(स्त्री.) }
वांगडें (अ.) बरोबर, संगतीं
वॉन्च ( वि, क्रि. वि. ) थोडें
वेंगाटता (क्रि.) मिठी मारतो
व्हाएन (न.) उखळ ( दगडी, लहान )
शाक } ( स्त्री० ) भाजी
शेक }
शेकेक ( स्त्री ) भाजीला
शिगमो ( पु.) शिमगा
शिलको ( स्त्री. अने. व.) चोया
शिळको ( स्त्री. अने. व. ) कळा, वेग
शेकार ( पु.) शाकार [घरावर घालण्याचें गवत]
शेग [ स्त्री.] रांग [ एका टोकापासून सरळ )
शेणो [ वि. ] शहाणा
शेलको [ वि.] निवडक
सकमार [ वि. ] सुकुमार, नाजूक
सर्गीन [ वि.] जड
सत [ न. ] सत्य [ शपथ घेऊन किंवा देवावरचें फूल काढून वगैरे सांगणें]
सताड (वि.) पुरें, साफ
सन्शेव (पु.) शंका, संशय
समशान (न.) स्मशान, मसण
सय (स्त्री.) आठवण
सर (अ.) पर्यंत
सरॉन्‌ (स्त्री.) पर्जन्यकाळ संपल्यानंतरचा हंगाम
सराप (पु.) १ सर्प २ शाप
सर्म } (न.) शरम, लाज
सरम }
साकार (स्त्री.पु.) १ साखर २ पाण्याचा (पाटाच्या ) प्रवाह अडकविणारा ( पानें वगैरे ) गाळ
साकूळ (स्त्री.) १ भाजावळ केल्यावर न जळतां किंवा अर्धवट राहिलेला गाळ. २ चेंदामेंदा,
सांगूळ (स्त्री.) फणसाची सकट ( पातीं, आठिळा वगैरेसह ) भाजी
साद (स्त्री.) हाक
सामको (वि.) समोर, सरळ, नीट, योग्य
सामनी (अ.) समोर, देखत
सारें (वि.) सारखें, समान
सुकवशी (स्त्री.) वाढती क्षीणता
सूळ (पु.) १ वेग, ठणका २ उभी व मोठी घाटी ( उंच व कठीण चढणीची )
सोकावलो (क्रि.) १ अति तहानेला २ सवकला
सोगो (पु.) शेवट, पदर, टोंक, ओचा
सोपाट (न.) १ केळ, चवई ह्यांची रुंदट साल २ वाळून पातळ व नरम झालेला दोर( रुंदसर )
सोपारें (वि.) सोपें, सुलभ
सोरगत (स्त्री.) लग्नाकरितां नवरी
हटक (क्रि.) विचार
हडस (क्रि.) हालव
हा (क्रि.) आहे
हाड (क्रि.) आण
हुरुमाल (पु.) रुमाल
हुंबर (पु.) उंबर
हुंबरो (पु.) उंबरा ( दाराचा )
हूट (पु.) १ चेव २ सूड
हुराडें (न.) ऊर, छाती
हुसाकलें (क्रि.) पळालें, सुटलें
हेर (वि.) दुसरें, इतर
होडांगो (पु.) मोठा, लठ्ठ
होनी (स्त्री.) वहिनी ( भावजय )
हॅन्‌ (अ.) एथें.
हॅन्सर (अ.) एथपर्यंत; हॅन्सून (अ.) एथून
हुलकाट (स्त्री.) हूल, कंडी
हुलप (पु.) आगीचा डोंब, संताप
मुजरत (अ.) मुद्दाम
मुस्तेद (क्रि. वि.) पुरें, पूर्ण
साणें (न.) कोनाडा

## अस्सल चित्पावनी भाषेंतील कांहीं विशेष शब्द

अद्रून (क्रि. वि.) १ मुद्दाम २ हटकून
अचुंवित (अ.) अकस्मात्
आवोट (स्त्री. ना.) उन्हाळा
आडफांटो (पु.) आक्षेप, हरकत
आडमेळा (न. ना.) आडकाठी, प्रतिबंध
आदवेचो (वि.) पहिल्यानें-प्रथम परिचयाचा
आपलूक } (भा. ना.) आपलेपण, स्वकीयता
आपुलकी }
इतलां (सर्वना; वि.) इतकें
उचापत (स्त्री.) उसनवारी, उधारी, कर्ज वगैरे करणें
उठवळ (वि.) आळशी, चुकार
उदंड (वि., क्रि. वि.) पुष्कळ
उपराळो (पु.) १ साह्य २ प्रत्युउपकार
उवायचे (क्रि.) उष्मा होतो
उसरी (स्त्री.) भोपळा वगैरेच्या सुकवून ठेवलेल्या फोडी ( पाहिजे तेव्हां भाजीच्या उपयोगी )
उभवणां (न.) पावसानें न भिजण्याचें साधन ( घोंगडी, इरलें वगैरे )
उळीग (न.) सण, श्राद्धपक्ष, वगैरे नैमित्तिक विशेष.
ऊत (पु.) भर, आधिक्य, मर्यादे बाहेरची स्थिति
ओथिवळो (पु.) थेंब थेंब अशी गळती
ओप (स्त्री.) १ कोवळें ऊन २ थोडी उष्णता किंवा वाफ
कय (क्रि. वि.) कधीं, केव्हां
कयाहीन (क्रि. वि.) निस्तेज
कव (स्त्री.) फार मोठी झीट, वेशुद्धि
कवडसो (पु.) छिद्रांतून येणारा किरण
कस (स्त्री.) अवशेष, कसर
किरचण (स्त्री.) वारीक फोडी, चुरा
कुरपण (न.) लहान टोपली
कुरापत (स्त्री.) कळ, खोडी
कोवाळ (पु.) फारसें काम न होणारीं मुलें, म्हातारीं माणसें वगैरे समुदाय. सटर फटर वस्तूंचा भरणा.

खड (पु.) खाणें ( पुष्टिकारक )
खपाटां (न. अने. व.) गालफडें, कानशिलें वगैरे भाग
खमलां (क्रि.) स्थिरावलें
खुपसट (न.) कळ, खोडी, कुरापत
खेड (स्त्री.) मिसळ
गाळ (स्त्री.) शिवी
गीम (पु.) उन्हाळा ( पावसाळ्यानंतरचा काळ )
गोटा (अ.) जवळ, सन्निध
चकट (स्त्री.) चटक
चट (स्त्री.) सवय
जथय (क्रि.) नीट जपून साठव
जथो (पु.) अगोदरचीं मगचीं–भाऊ वहिणी वगैरे भावंडें, आई वाप इत्यादिकांनीं युक्त स्थिति. ( लग्न जुळविण्यापूर्वी वधूवरांसंबंधी पाहण्याच्या गोष्टींपैकीं ही एक अवश्य गोष्ट आहे.)
जायजणां (वि.) दुसऱ्याकडील दागिने, भांडीं कुंडीं, वस्त्रें, वगैरे गरज संपतांच परत द्यावयाचीं अशा पद्धतीनें आणिलेलें (सामान)
जुगय (क्रि.) जमव, जुळव
झगरां (न.) बारीक निखारे असलेली तत राख ?
झेम (स्त्री.) डुलकी
टेव (पु.) नखरा, नट्टी पट्टी
ठाय (पु.) पुरें जेवण वाढलेलें पान, पूर्ण जेवणाचे पदार्थ
ठाव (पु.) १ आश्रयस्थान २ मनांतील बेत ३ पाण्याचा तळभाग
ठिंबो (पु.) थेंब
ठोसलो (पु.) जाड मजबूत अशी बांगडी
तांतड (स्त्री.) त्वरा, घाई
तिकटां (न.) लहान पत्रावळ
तिमणां } (न.) प्रथम रजोदर्शन, गर्भाधान,
तिमाणां } प्रसूति, वगैरे समयीं माहेरचें सासरीं अगर सासरचें माहेरीं भोजन साहित्य, अहेर, वगैरे सामान

# अभिप्राय

**नाट्यसूक्ति**—( संग्राहक--केशव रामचंद्र कुळकर्णी, किं. ८ आणे ) या पुस्तकांत रा. कुळकर्णी यांनीं नाटकांतील सुभाषितांचा संग्रह केला आहे. कल्पना चांगली आहे. दुसऱ्या आवृत्तीच्या वेळीं सूक्तींची निवड अधिक दक्षतेनें करावी.

**अर्वाचीन मराठी वाङ्मय**—( ले. गणेश रंगनाथ दंडवते, किं. १ रु. १० आणे. ) स. १८०५ पासून १९२७ पर्यंतच्या मराठी वाङ्मयाचा इतिहास या पुस्तकांत ग्रथित केला आहे. अशा पुस्तकाची जरूरी होती. म्हणून रा. दंडवते यांचें अभिनंदन करणें अवश्य आहे. या पुस्तकांत परिश्रमपूर्वक माहिती गोळा केल्याचें दिसून येतें. असल्या पुस्तकांत कांहीं अनुल्लेखित ग्रंथ राहणें अपरिहार्य असतें म्हणून तें क्षम्यच मानलें पाहिजे. एकंदरींत पुस्तक उपयुक्त व संग्राह्य आहे.

**त्रिदल**--( गिरजाबाई विंचूरकर, शांताबाई हेबळीकर व युवराज पंतसचीव यांच्या कवितांचा संग्रह आहे. हल्लीं काव्यग्रंथ पुष्कळच निर्माण होत आहेत. त्यांत या कवितांचा नंबर खालीं लागेल असें मानण्याचें कारण नाहीं. कविताकारांत काव्यशक्ति आहे यांत संशय नाहीं. विशेषतः प्रसाद व नाजूकपणा आहे. ही काव्यशक्ति श्रीमंत अशा सरदार घराण्यांत प्रविष्ट झाली त्यामुळें ती तेथें अधिक शोभायमान दिसते. यांतील कविता वाचून क्षणभर मनाला समाधान होतें. चित्तवृत्ति उल्लसित होते.

पण या ग्रंथानें मनामध्यें मिश्र विचार उत्पन्न होतात. गद्यामध्यें लिहिलें असतां जें रूक्ष, नीरस व टाकाऊ वाटतें तेंच पद्यांत आणलें कीं सरस व संग्राह्य ठरतें. गद्य स्वरूपांत जे अशिष्ट अथवा अश्लील वाटतें तेंच पद्य स्वरूपांत शिष्ट व सभ्य होतें. कर्ता प्रतिभासंपन्न बनतो. असा हा काव्याचा महिमा आहे. प्रेमगीतांचा सध्यां जयजयकार होत आहे. हें पद्यनिविष्ट गद्यस्वरूपांत प्रकट न होवो म्हणजे झालें ! तसेंच आजपर्यंत पुरुष कवींकडून होणारा प्रेमस्फोट यापुढें स्त्रीकवींकडून होईल; आणि असें झालें म्हणजे समाजांत काय क्रांति होईल याची कल्पनाच केली पाहिजे. शिवाय स्थानपरत्वें वस्तु खुलत असते. श्रीमंतीशीं सरस्वतीचा समागम झाला असतां तो फारच मनोहर वाटतो. पण विद्यार्थीदशेंत प्रेमगीतांचे आलाप कसे दिसतात याची चिकित्सा गुणसमीक्षकांनीं केली आहे कीं नाहीं हें आम्हांला सांगतां येत नाहीं. कारण मूळापेक्षां हें गुणभाष्यच अधिक आहे. कारण २१ जणांनीं या काव्यावर अभिप्राय दिले असून तेहि छापले आहेत. या समीक्षकांत वासुदेवराव आपटे, दा. ना. आपटे, चिं. वि. वैद्य, द. वा. पोतदार वगैरे काव्यरसिकांचे ( ? ) हि अभिप्राय आहेत. आणि या सर्वांत मेरुस्थानीं शोभणारा अभिप्राय अग्निहोत्री राजवाडे यांचा आहे. अभिप्रायांच्या एकंदर १०४ पानांपैकीं राजवाड्यांच्या अभिप्रायानें ७० पानें घेतलीं

आहेत. त्याशिवाय प्रो. चापेकर यांनीं त्रिदलाचा सत्कार १३ पानांत केला आहे तो निराळाच. अशा या अभिप्रायांच्या ओझ्याखालीं बिचारें त्रिदल चिरडून गेलें नाहीं हें भाग्यच. बिल्वदल म्हणूनच तें टिकलें. असो. हें त्रिदल त्रिजन्मपापसंव्हारक नसलें तरी अल्पकाल संतोषदायक आहे हें खास. या काव्यनिर्मितीबद्दल युवराजांचें व त्यांच्या स्नीआप्तांचें आम्ही समर्याद अभिनंदन करतों.

**संगीत प्रणय-बंध** – (ले. रा. स्वा. नाईक–मन्दारमालेचें प्रथम पुष्प, किं. १ रु.) हें एक सामाजिक विनोदी नाटक आहे. रा. नाईक यांनीं याच्या पूर्वीं 'रमणी'' ''अनाथिनी'' हीं दोन नाटकें लिहिलीं आहेत. प्रस्तुत पदांतील पदें सुबोध आहेत. मुलामुलींचीं लग्नें जुळविण्याच्या कामीं आईबापांनीं लुडबुडूं नये असा जो सध्यां विचारतरंग उठला आहे, त्याला प्रोत्साहक असें रा. नाईक यांनीं नाटकाचें कथानक सजविलें आहे. बाप आपल्या मुलीचा हात एका वयस्क, व्यसनी श्रीमंताच्या हातांत घालण्यास प्रवृत्त होतो. पण मुलीचें प्रेम एका उमद्या स्वभावाच्या तरुणावर असतें आणि त्याच्याशींच तिचें लग्न अखेरीस होतें. पण अनुसूयेला अर्धवटच कां सोडून दिली ? वसंतापेक्षां चन्द्रकांतच नायकाचे गुण त्याच्यांत अधिक आहेत असा दिसतो. रा. नाईक यांनीं अधिक प्रौढ नाटकें लिहिण्याची हांव बाळगावी. तसेंच इतर नाटकें किंवा कादंबऱ्या फार वाचल्यानें अज्ञानतः आपण आपल्या कृतीला उसनेपणा आणितों, हें विसरूं नये.

**राधामाधव**—(काव्यसुगंध, कुपी १ ली. लेखक, श्रीधर मुकुंद शे. सांवर्डेकर किं. ११ आणा ) हें एक ६० कवितांचें विनोदी काव्य आहे. "हुंड्यावांचुन नोवरा न वरी या देशीं सुकन्या जरी" ही या काव्याची मुख्य कल्पना आहे. हुंडा न मिळाल्यामुळें टाकलेल्या बायकोनें नवऱ्याची चांगली फजिती केली आहे. काव्यांत मात्रादोष फार आहेत, तरीपण वाचतांना गंमत वाटते.

**मोगरा**—कवी बन्सीधर ऊर्फ खंडेराव भिमराव कुळकर्णी. प्रकाशक रामदास नारायण नाईक तुकारामाश्रम टिळकवाडी, पुणें, किं. १२ आणे. ) १६८६ ओळींचा आणि ११ पाकळ्यांचा हा मोगरा मधुर आहे. सरला व श्रीधर यांच्या प्रेमाची कहाणी यांत वर्णिली आहे. यांच्या प्रेमाचें पर्यवसान विवाहांत न होतां बहीणभावाच्या नात्यांत झालें आहे. रा. म. रा. उपासनी ऊर्फ कृष्ण यांची प्रस्तावना गुणदोषविवेचक असल्यामुळें त्यापेक्षां अधिक काय लिहितां येणार ? "मोगऱ्यानें महाराष्ट्र सारस्वतांत एका उत्तम रत्नाची भर पडेल; व मोगरा आधुनिक खंडकाव्यांत उच्च दर्जाचा ठरेल'' ही रा. नाईक यांची अपेक्षा अगदींच वायफळ ठरणार नाहीं. रा. बन्सीधर यांची काव्यशक्ती वर्णनीय आहे.

**उषादेवी**—( सरस वाङ्मय रत्नमालेचें ७७ वें रम्यरत्न. कादंबरीकार रा. रा. भिकाजी गोपाळ भिडे; संपादक व प्रकाशक तात्या नेमिनाथ पांगळ; किंमत ३ रुपये.) रायडर हॅगार्ड नांवाच्या इंग्रेजी कादंबरीच्या आधारानें रा. भिडे यांनीं उषादेवी अथवा मायावतीचा पुनर्जन्म ही कादंबरी लिहिली आहे. अद्भुत कथानक व प्रगल्भ भाषा यांमुळें ही कादंबरी वाचाविशी वाटते. "चटकदार" हें विशेषण या कादंबरीस कोणीहि बहाल करील. अद्भुत गोष्टींनीं भरलेल्या कादंबऱ्यांचा काल संपला असें आम्हांस वाटत होतें. पण तें खरें दिसत नाहीं.

**कीर्तनवल्लरी**—( कीचकवध व बाजीप्रभु देशपांडे. किं. अनुक्रमें ५ व ३ आणे. लेखक पांडुरंग दत्तात्रय खाडिलकर एम्. ए. ). रा. खाडिलकर यानीं हीं दोन आख्यानें कीर्तनाकरितां रचलीं आहेत. श्रीमंत बाळासाहेबपंत यांनीं रचलेलीं कीर्तनें प्रसिद्ध झालीं आहेत. खाडिलकरांचा हा प्रयत्न स्तुत्य आहे. मराठी वाङ्मयांत ही एक नवीन दिशेनें भर पडत आहे. कीर्तनांतलें भाषण सहज समजेल असें पाहिजे. "चरणकमलांतील धूलिपराग आपल्या मौलिमुकुटानें हळूच टिपून घ्यावे." ही भाषा जरा अवजड वाटते. कारण कीर्तनांत अशिक्षितांचा भरणा पुष्कळ असतो. तसेंच कित्येक ठिकाणीं भाषणें मोठीं व कादंबरीच्या धर्तीवर झालीं आहेत. एकापुढें एक दोनतीन श्लोक हि एकदम म्हणण्याचा प्रसंग येणें चांगलें नाहीं. विनोदाला कीर्तनांत स्थल पाहिजेच. तसेंच समाजांतील मूर्ख आचारांचा उपहासात्मक निर्देश हें हि एक कीर्तनाचें प्रमुख अंग मानलें जातें. या गोष्टी पुढील कीर्तनें रचतांना श्री. खाडिलकर विसरणार नाहींत अशी आशा आहे. तसेंच आख्यानांना प्रस्तावना पाहिजे होती. चांगल्या आख्यानांप्रमाणें विद्वान् कीर्तनकारहि निपजले पाहिजेत. श्रीमंत बाळासाहेब पंतांच्या योग्यतेचा कीर्तनकार दुर्मिळ झाला आहे. ही उणीव रा. खाडिलकर भरून काढतील अशी आशा आहे.

**कर्नाटक-महाराष्ट्रमंडळ-धारवाड**—( द्वितीय वार्षिक अहवाल. प्रकाशक गोपाळ काशिनाथ सहस्रबुद्धे ) अन्यसमाजांत महाराष्ट्रीय जाऊन राहिले असतां त्यांनीं आपला एक संघ बनवणें अवश्य तसें साहजिक आहे. वरील अहवाल पाहतां कर्नाटकांतलें हें महाराष्ट्रमंडळ उत्कर्षाच्या मार्गावर आहे असेंच दिसून येतें. धारवाडांतल्या प्रत्येक महाराष्ट्रियानें या मंडळाचा सभासद होणें अवश्य आहे. मंडळाच्या सभासदांना नैतिक वर्तनाचें महत्त्व वाटत नाहीं हें पाहून वाईट वाटतें. कारण निम्मे वर्गणीदारांनीं आपली वर्गणी दिली नाहीं. न मागतां वर्गणी देणें हें प्रत्येक सभासदाचें कर्तव्य आहे. अशी कर्तव्यजागृति ठेवली नाहीं तर आपली छाप महाराष्ट्रीयेतरांवर पडणार नाहीं. मंडळानें कादंबऱ्या व नाटकें सध्यां मुळींच विकत घेऊं नये. इतिहास, चरित्रें, निबंध व शास्त्रीय पुस्तकें यांचाच प्रथम संग्रह करावा. मंडळाच्या ग्रंथांचा कानडी बंधू उपयोग करीत आहेत ही अत्यंत आनंदाची गोष्ट होय. अहवाल

चांगल्या भाषेंत लिहिला आहे. ठिकठिकाणच्या महाराष्ट्रमंडळाचें अहवाल एकत्र प्रसिद्ध करण्याची योजना कोणी केल्यास चांगलें होईल.

**भारतमित्र**--(वर्ष ५ अंक ६-७ संपादक नारायण भास्कर नाईक ) सामान्यजनतेंत शिक्षणप्रसार करावयाचा असल्यास असे लेख पाहिजेत कीं थोडक्यांत पुष्कळ महत्त्वाची विविध माहिती वाचकांस मिळावी या दृष्टीनें भारतमित्राचा हा जोड अंक आदर्शभूत आहे.

**सचित्र शिवणकला**-- ( वर्ष ७ अंक १ ला. संपादक प्रो. श्री. ह. काकडे एफ. सी. डी. ( लंडन ) वा. व. २ रु. ४ आ.) केवळ शिवणकामाच्या धंद्याला वाहिलेलें हें द्वैमासिक त्या धंद्यांतील लोकांस उपयुक्त वाटल्याशिवाय राहणार नाहीं.

**मालवसाहित्य**—( इंदूरमहाराष्ट्रसाहित्यसभेतर्फे प्रसिद्ध होणारें त्रैमासिक; प्रथमांक ) या त्रैमासिकाला मालवसाहित्य हें नांव अन्वर्थक कसें होते या विषयीं शंका वाटते. त्रैमासिकाच्या उपक्रमाबद्दल आम्ही इंदूरसाहित्यसभेचें अभिनंदन करतों. रा. ब. किबे, बोरगांवकर, आपटे वगैरेंचे लेख वाचनीय आहेत. या त्रैमासिकाच्या द्वारें माळव्यांत मराठीवाङ्मयाचा उत्कर्ष होईल अशी आम्हांस आशा आहे. उत्तम मासिक चालवावयाचें म्हणजे संपादक नेहमीं विचार करणारे असावे लागतात. लेख लिहिणें प्राप्त आहे, एवढ्याच करतां हातांत लेखणी धरणारांच्या कडून मननीय लेख उतरत नाहींत. आपल्या स्वतःच्या विचारांचें फल म्हणून लिहावयास लागणारांचे लेख आपोआपच उत्कृष्ट वठतात. मालवसाहित्याचा संपादकवर्ग याच जातीचा असल्यामुळें या त्रैमासिकाच्या भवितव्यतेबद्दल शंका घेण्याचें कारण नाहीं.

**बृहन्महाराष्ट्रब्राह्मणपरिषदेच्या शके १८४९-५० मधील कार्याचा वृत्तांत**--परिषदेचें प्रचारकार्य चांगल्या रीतीनें चाललें आहे व त्याचें श्रेय वे. शा. नरहरशास्त्री जोशी यांस आहे. सुधारणेला शास्त्र्यांकडून सहाय्य होत आहे अर्थात् इतका काल बदलला आहे, हें सर्व ठीक आहे. पण ब्राह्मणपरिषदेचे चालक काळोखांत वावरत आहेत असा भास होतो. त्यांना प्रकाशाची जरुरी आहे.

---

# ऐतिहासिक पत्रें

( सं.—प्र. धों. कानिटकर. )

१

खालीं दिलेलीं आज्ञापत्रें धोम येथील गुरवाजवळ असलेल्या अस्सल पत्रांच्या नकला आहेत. पत्रें अथवा सनदा जुन्या शाहू महाराजांच्या वेळच्या आहेत. धोमास नृसिंह व सिद्धेश्वर हीं देवस्थानें प्रमुख आहेत. या देवस्थानांस दिलेल्या जमिनीसंबंधाचीं हीं पत्रें आहेत.

स्वस्तिश्री राज्याभिषेक शके ३५ विरोधीनाम संवत्सरे आधिक (       ) बहुल प्रातिपदा गुरुवासरे क्षत्रिय कुलावतंस श्री राजा शाहु छत्रपति स्वामी याणी राजश्री देशाधिकारी व लेखक वर्त-(मान व भा)वी प्रांतवाई यासि आज्ञा केली ऐसी जे. श्री देव मौजे धोम संमत हवेली प्रांत मजकुर येथील गुरवाणे हुजूर येऊन विदित केले की श्री कडील नैवेद्य व नंदादीप व देवसे(व )कास मौजे मजकुरी पूर्वी मोईन करून दिल्ही आहे तेणे प्रमाणें बिला-कुसुर पावत नाही हे वर्तमान आपण राजश्री परशराम पंडित यास विदित केलें त्याणी मनास आणुन इनाम जमीन नेमुन दिल्ही. देखील बाबती देविले असे.

दीर्घ वर्तुळआकार शिक्का
श्री
शिव नरपति हर्ष
निधान मोरेश्वर
सुत भैरव मुख्य
प्रधान

वाटोळा वर्तळाकार शिक्का
श्री शंकर श्री
शाहु छत्रपति
कृपानिधि प्रलहा
द सुत गदाधर +
प्रतिनिधी

| | | | |
|---|---|---|---|
| ८५ | नवेद्यास नरसिंह व सिधेश्वर. | गुरव पुजारी | ८५ |
| ८१० | नंदादीप दोही देवास | फुलारी व कर्णेकरी नरसोजी | ८५ |
| ८२५ | वाजांत्री नफर ५ ये॥ | लोटझाड | ८५ |
| ।१० | | बांकेकरी | ८५ |

येणें प्रमाणे अर्ध चावर जमीन इनाम नेमुन दिल्ही आणि पत्र दिल्हे त्यास मौजे मजकूर ब्राम्हणास इनाम आहे त्यांणी सुभा येऊन जमिनीची कीर्द गुरवाच्यानी होणार नाहीं पूर्वी मोईन चालत आहे त्याप्रमाणें आपण चालवितो ऐसा निर्वाह केला परंतु मोइनीप्रमाणे ( पावाख ) श्रीचा मोहच्छाव व देवसेवकाचा कालक्षप चालत नाही तरी स्वामीनी अर्धा चावर जमीनच देवास करार करून दिल्ही पाहिजे आपण कीर्द करून उत्पन्न होईल त्यावरी देवाचा मोहछाव चालऊ म्हणोन विदित केले त्यावरून श्री स मौजे मजकुर पैकी जमीन चावर निम राजश्री परशराम पंडित आमात्य याणी पहिले इनाम करून दिल्हाप्रमाणे स्वामीने करार करून हे आज्ञापत्र सादर केले

आहे तरी तुम्ही मौजे मजकुरपैकीं अर्धा चावर जमीन श्रींकडील गुरवाचे स्वाधीन करून श्रीस बिलाकुसुर इनाम चालवणे. या पत्राची प्रत (दा)खला घेऊन हे पत्र भोगवट्यास परतोन देणे. जाणिजे लेखनालंकार

( वर्तुळाकार शिक्का ) मर्यादेयं राजते

रुजु सुरु सद्रबार पोछ २७ सफर.

२

फाल्गुण बहुल अमावास्या रविवासरे क्षेत्रिय कुलावंस श्री राजा शाहु छत्रपती याणी कमाविसदार व मोकदम मौजे धोम प्रांत वाई यासी आज्ञा केली यैसीजे. श्री स्थान मौजे मजकुर या देवास नैवेद व नंदादीप व सेवक लोक यास मौजे

(दीर्घ वर्तुळाकार शिक्का)
श्री
शाहु नर
पति हर्ष नि
धान मोरेश्वर
सुत भैरव
प्रधान

( वर्तुळाकार शिक्का)
श्री शंकर श्री
शाहु छत्रपति कृ
पानिधि प्रल्हाद सु
त गदाधर प्रति-
निधि

मजकूर पैकी जमीन चावर ·॥· निम देऊन पेसजी सनद सादर केली आहे तेणे प्रमाणे जमीन नेमून देत नाहीं कटकट करता म्हणून विदित जाले. त्या वरुन हे आज्ञापत्र सादर केले आहे. तरी पेसजी सनद सादर असेल त्याप्रमाणे जमीन इनामाची नेमून देऊन चालवणे आणि देवाची उर्जा सांग चाले यैसे करणे बोभाट आलिया ताकीद होईल जाणिजे पेसजी इना(म) जमिनीचे ठिकाण नेमून दिले नसेल तरी हाली निमे हारदु जमीन निमे कीर्दी जमीन नेमून देणे. लेखनालंकार

( वर्तुळाकार शिक्का ) मर्यादेयं राजते.

रुजु सुरु सुदबार.

३

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ३९ नंदन संवत्सरे माघ बहुळ पंचमी सौम्य वासरे क्षत्रिय कुलावतंस श्रीराजा शाहु छत्रपती स्वामी याणी मोकदमानी मौजे धोम पा वाई यासि आज्ञा केली ऐसी जे श्री मौजे मजकूर येथील गुरव स्वामी सनिध येऊन विनंती केली कीं पेशजी स्वामीनी श्रीस नैवेद्य व नंदादीप व श्रीच्या सेवकांचा योगक्षेम चालिला पाहिजे म्हणोन मौजे मजकुरीं

दीर्घ वर्तुळाआकार शिक्का
श्री
शिव नरपति हर्ष
निधान मोरेश्वर
सुत भैरव मुख्य
+ प्रधान +

अष्टकोनी वतुर्ळाकार शिक्का
श्री आइ
आदि पुरुष श्री
राजा शाहु छत्रपति
स्वामिकृपानिधि त
रय परशुराम त्र्यंब-
क प्रतिनिधि

अर्ध चावर जमीन इनाम कुलबाव कुलकानु देऊन सनद सादर केली त्यास पाटील चालो देत नाहीं. नसता अलांडा बलांडा व जेवे वेठबिगारी मनस्वी घालून तगादा

करितात येणेकडून श्रीचे सेवक कांहीं पळोन गेले कांहीं राहिले त्याकडून सेवा घडत नाहीं. श्रीचा मोहोत्छाह चालत नाहीं म्हणोन विदित जाले तरी हे देवस्थान पुरातन महास्थळ प्रसिध आहे. येथील उर्जा चालवावी स्वामींस अगत्य आहे त्यास तुम्ही थोतांड करून श्रीकडील इनामास उपसर्ग देता बलांडे घालून तगादा करिता व वेठबेगारीचे त्वष्ट गुरवास लाविता हे कोण गोष्टी या उपरी हें आज्ञापत्र सादर केले असें. तरी तुम्ही पेशजी नेमून दिल्हेप्रमाणे जमीन इनाम चालऊन श्रीचा मोइत्छाह अविछिन्न चाले व गुरवास वेठ बेगार जेवे याचा तगादा न लागे ते करणें. श्रीच्या मोइत्छाहास अंतर जाले व गुरवास तगादा लाविला म्हणजे तुमचा मुलाहिजा होणार नाहीं हे बरे जाणो(न) आज्ञेप्रा। वर्तणुक करणे आण याची तालीक लेहोन घेऊन हे पत्र गुरवाजवळ परतोन देणे जाणिजे लेखनालंकार

( वाटोळा वर्तुळाकार शिक्का. ) मर्यादेयं राजते.

श्रीमंत महाराज मातुश्री————आईसाहेब यानीं मोकदमानी मौजे धोम संमत हवेली पा। वाई यांसी आज्ञा केली ऐसीजे:—गुरव पुजारी श्री————वास्तव्य मौजे मजकूर यांणी हुजूर येऊन विनंती केली जे मौजे मजकूर पूर्वी महाराज——कैलासवासी स्वामी यांनीं श्री——.——चा नैवेद्य नंदादीप व सेवक लोक गुरव यांचे वेगमीस जमीन कुलबाव कुलकानु दरोबस्त जमीन चावर नीम ‘॥’ येकूण विघे साठ वंशपरंपरेनें इनाम करून देऊन बाकी मौजे मजकूर स्मार्थ व वैष्णव वास्तव्य कसबे-वाई यांसी अग्राहार इनाम करून दिल्हा श्रीचा नैवेद्य व नंदादीप व सेवक लोक गुरव यांसी साठ विघे जमीन देविली होती त्याची वांटणी राजश्री शंकराजी नारायणे सचीव यांनीं करून देऊन आपलें पत्र करून दिल्हें तपशील:—

| किता | किता |
|---|---|
| ८५ श्रीच्या नैवेद्यास जमीन विघे पांच | ८२५ वाजंत्री गुरव असामी पांच यासी जमीन विघे पंचवीस. |
| ८१० श्रीच्या नंदादीपास जमीन बिघे दहा | ८५ फुलारी व कर्णेकरी नरसोजी यासी विघे पांच. |
| ८५ पुजारी गुरवास जमीन विघे पांच | ८५ झाटलोटे विघे पांच. |
| | ८५ बांकेकरी यासी विघे पांच. |
| ८२० | ‘१० |

एकूण जमीन बिघे साठ नेमून दिल्ही त्या उपरी महाराज——कैलासवासी स्वामी मोगलाईंतून स्वराज्यास आले ते समई विरोधी नाम संवत्सरीं पूर्वील पत्रें सेवेसी विदित केलीं त्यावरून महाराज स्वामीनींही आपलें पत्र करून दिल्हे त्यास मोकदम व आग्राहारी ब्राम्हण यानीं तीस विघे जमीन आमचे दुमाला केली बाकी तीस विघे जमीन आमचे दुमाला करीत नाहीं म्हणून विनंती केली व पूर्वील पत्रें आणून दाख-

विली ती मनांस आणून हें आज्ञापत्र सादर केलें असे तरी पूर्वी श्री——देव वास्तव्य मौजे मजकूर येथील नेवेद्य नंदादीप व सेवेचे गुरव यांसी साठ बिघे जमीन देऊन वरकड मौजे मजकूर ब्राम्हणांस आग्राहार दिला असतां यांची जमिन न द्यावयास तुम्हांस प्रयोजन काय या उपरी पूर्वी श्री सेवळलोक यांसी साठ बिघे जमीन देविली आहे त्याप्रमाणें गुरवांचे दुमाले करून वंशपरपरेनें चालवून वरकड ऐवज आग्राहारी ब्राम्हण यांसी पावीत करीत जाणे ये विषयींचा बोभाट आलिया ताकीद होईल प्रती-वर्षी नवीन पत्राचा आक्षेप न करणे ह्या पत्राची प्रती लेहून घेऊन हें पत्र भोगवटी-यास याजपांशी परतोन देणे जाणिजे छ १९ माहे शाबान सूरसन सलासखमसैन मया अल्फ. लेखनालंकार

( वर्तुळाकार शिक्का. ) लेखन शूध.

वारसुद सुरु सुदबार.

( वर्तुळाकार शिक्का. ) लेखन शूध.

---

# सारिकाशतकी

( संग्राहकः — काशिनाथ परशराम साने, शिक्षक राजुरी )

श्रीमंत समस्तगुणसंपन्न स्वधर्मपरिचर्यामहदऐश्वर्यविराजमान—त्रिभुवनतीलक सामंतचक्रवर्ति नानाप्रकृतिसमाधानकल्पद्रुम महाराज माधवप्रभुकौतुकार्थ आनन्यभावे चरणारविंदशेवक गोखलोपनाम बापूजी गोविंद

## कथा १

पूर्वी राजा शिवदत्त भरथपुराचे ठाईं राज्य करित असे त्याचे नामेकरून गुणसागर परंतु केवळ मूर्ख म्हणोन राजा चिंताग्रस्त होऊन विचार करिता जाला कीं मी वृध्द राज्य थोर पुत्र मूर्खशिरोमणी पुढें राज्याचें संरक्षण माझी सत्कीर्ति होय असा उपाये करावा काय आहे. मग शिवदत्त राज्यभार प्रधानाचे ठाई ठेऊन आपण अरण्यांत जाऊन श्री चिंतामणिमंत्र करून चिंतामणीची उपासना करिता जाहाला. बारावर्षे कंदमुलफल भक्षण करून राहिला उपरांत स्वामीदयानिधि श्री चिंतामणि प्रसन्नवरदोनान्मुख प्रत्यक्ष होऊन बोलिला कीं शिवदत्ता तुझ्या चित्तांतील सर्वभाव मजला समजला तुझ्या पुत्रास चतुरता प्राप्त होऊन राज्य संरक्षण व्हावे यास्तव तूं माझी सेवा बहुत केलीस आता तुजला एक सारिका चातुर्यलतिका या नामे देतो. ती आपले पुत्राचे शय्ये समीप उंचस्थली ठेवावी म्हणजे ती तुझे पुत्रास राज्योपयोगी करील. उपरांत आपले स्थलास जात्ये ऐसे बोलेल त्यासमई तिजला सोडून द्यावी ऐसे राजा शिवदत्त यास सांगून चातुर्यलतिका रत्नखचित पिंजरिया सहित दिली आणि आपण अदृश्य जाहाले ती सारिका साक्षात सरस्वतीचा अवतार तिजला घेऊन परमानंदे चिंतामणीचे आज्ञेने माघारा स्वनगरास येता जाहाला आणि चातुर्यलतिकेचा पिंजरा नेऊन गुणसागराचे शय्ये समीप ठेविला त्याचे शय्ये समीप आपले निद्रेचे स्थल योजिलें उपरांत राजपुत्र गुणसागर भोजनोत्तर शयनार्थ आला तेथें अपूर्व पिंजरा व सारिका पाहून विस्मय पावला आणि विस्मयावेशे निद्रा विसरून सारिकेस बोलाऊं लागला तेव्हां प्रथम दिवशीं एक प्रहरानंतर एकशब्द बोलली. दुसरे दिवशीं त्यापेक्षां अधिक या प्रमाणें बोलूं लागली तेव्हां मंजूळ भाषणेंकरून गुणसागराची आस्था चातुर्लतिकेचे ठाईं होऊन समस्त दुष्ट समागम व दुर्व्यसन सहजांत दूर जाहाली. आणि ईश्वरा प्रमाणें तिचे भजनास लागला. असें करितां एक महिन्याने चातुर्यलतिका उत्तर प्रत्युत्तर देऊं लागली. मग एके दिवशीं गुणसागरास म्हणाली कीं राजपुत्रा तूं आपले विलास सोडून मी आरण्यांतील पांखरूं मजपाशी सर्वकाळ काय समजून बसतोस ? नंतर गुणसागर म्हणाला कीं चातुर्यलतिके तुजबरोबर भाषण करितां क्षुधेची बाधा होत नाहीं व तृषाही तृप्त होते मग विलासाचे स्मरण कोठून होईल. हें वचन अभ्यं-

तरापासून बोलिला. ते श्रवण करून आपले स्वाधीन जाहाला असें चातुर्यलतिकेनें जाणून उपदेशास आरंभ करिती जाहाली. सारका शतकाचा मूळ संदर्भ येथून कथा प्रारंभ.

हे राजपुत्रा गुणसागरा तुझी आस्था माझे वचनाचे ठाईं आहे यास्तव कांहीं विचार सांगते श्रवण करावा. तूं सार्वभौमाचा पुत्र या अभिमाने करून राजविद्या राजनीति यांचा अनादर करितोस हें उचीत नाहीं. येणेकरून दिगांतरीचे राजे अति-संतोषी आहेत. कारण कीं, तुझा पिता वृध्य पुढें राज्य तुजला प्राप्त जाहाले असतां नीतीचे बोल सहज हारण करितील यास्तव गुणसागरा विद्याभ्यास करावा. विद्येंकरून जें सिध्य होतें तें द्रव्यसंपत्तीनें होत नाहीं. या अर्थी एक कथा सांगते त्ये श्रवण करावी.

श्लोक

दलिपलितकायेपि कर्तव्यः शास्त्र संग्रहः ।
न तत्र निधनो यांति पुत्र यांति बहुश्रुताः ॥ १ ॥

पूर्वीं विजयवर्धन नगरीं रूपसेनराजा राज्य करीत असे त्याचा प्रधान बहुश्रुत असें असतां रूपसेन याणें ऐकिलें कीं विद्याधर नगरीं अनंतसेन राजा आहे. त्याची कन्या मदनमोहिनी परम सुंदर यौवनवती आहें परंतु पुरुषाचें मुखावलोकन करित नाहीं ती आपण साधावी या अर्थी रूपसेन राजा याणे बहुत प्रयत्न केला. द्रव्यहि मनस्वी दिधले तथापि तेथें कोणाचें गमन न होय तेव्हां राजास खेद दीनवदन होऊन बसला आहे या समयांत बहुश्रुतप्रधान येऊन विचारिता जाहाला कीं महाराज, आपण सार्वभौम आपल्यास काय चिंता प्राप्त जाहाली आहे श्रीचे योगें म्लान वदन दिसते मग रूपसेन याणें सांगितलें कीं प्रधाना चिंता अपार जाहाली आहे कार्य तो दुःसाध्य आहे तें सिध्य न जाहाल्यास शरीर राहाणार नाहीं असें आहे या विषईं बहुत प्रयत्न केला परंतु कार्य सिध्य होत नाहीं. आतां तूं चतुर आहेस यास्तव या चिंतेचा परिहार करणें. असें बोलून राजकन्येचे वृत्त प्रधानास सांगितले. नंतर तो म्हणाला कीं, हें कार्य तो सहज बुद्धिसाध्य आहे मग द्रव्यव्यय किमर्थ केला शेवकास कांहीं कळविलें नाहीं प्रभूनी संकट विषयप्राप्त जाहाला असतां स्वतः विचार न करावा मंत्रीजनास आज्ञा करून त्याचे हातें परिहार योजावा स्वल्प विचारही एकास दुःसाध्य याच अर्थी श्लोक

यद्‍ध्यल्पंतरं कर्म तदप्येकेन दुश्वरं ।
पुरुषेण साहयेन किमु राज्यं महोदयं ॥ १ ॥

यास्तव राजा याणे सुमनुष्याचा संग्रह करावा तेणेकरून संकटें प्राप्त होणार नाहीं जाहालें तरी तत्काल परिहार होईल ते मनुष्य कशास असावे. या अर्थीचे श्लोक

साहायाचरयेत्प्रज्ञः कुलीनो भूपतिस्वयं ।
शूरान्कुलीनजातीयान्बलयुक्तान्धियान्वितान् ॥ १ ॥

रूपसत्वगुणोपेतान् सुश्रुतान् क्षमयान्वितान् ।
क्लेशक्षमान्महोत्साहान् स्वधर्मज्ञानप्रियंवदान् ॥ २ ॥
हितोपदेशेकाचिज्ञः स्वामिभक्तन् यशेपिनः ॥

याप्रमाणें मनुष्याचा संग्रह करावा. आतां मजला आज्ञा होईल तरी हें कार्य साहा महिन्यांत सिद्ध करितो असे बोलून राजाज्ञा घेऊन नंतर सर्व उपयोगी साहित्या-सहवर्तमान गुप्तरूपे बाहेर निघाला नंतर आपण महातपस्वी होऊन पांच सातशे शिष्यवर्ग समागमे घेतला आणि शिष्यास आपला नियम सांगितला कीं आपल्यास स्त्रीचें मुखावलोकन करावयाचें नाहीं. स्त्री समोर आल्यास शासन करावें बहुत सावधपणें वर्तावें. असे सांगून आनंतसेन याचे नगराचे मार्गें चालिला. ज्या नगरांत जाणे तेथें एक मजलीवरून सांगून पाठवावें कीं त्रिभुवनाधीश्वर तपस्वी येत आहेत उदईक राजमार्गांत स्त्रियानीं न जावे व गेल्यास शासन होईल याप्रमाणें ताकीद करून नगरांत जावें. असें जाता विद्याधर नगरासमीप गेला तो दूतांनीं वर्तमान निवेदिलें कीं माहाराज त्रिभुवनाधीश्वर म्हणोन तपस्वी या मार्गें श्रीवाराणसीस जाणार तो येतो आहे समागमे पांच सातशे शिष्यवर्ग आहेत आणि स्त्रीचे मुखावलोकन करीत नाहीं स्त्रीनें कदाचित् त्या मार्गाकडे पाहिलें तर शिष्य शासन करितात हे राजा अनंतसेन याणे आश्चिर्य आईकून कन्येस कळविलें नंतर कन्या मदनमोहिनी तिनें राजा यास सांगून पाठविलें कीं आपण सामोरा जाऊन तपस्वी स्वगृही आणून माझी भेट करावी मग राजा अनंतसेन आपण दर्शनार्थ जाता जाहाला आणि साष्टांग नमस्कार करून विज्ञापना केली माहाराज आपण थोर आपले दर्शन करून सकलदु:खाचा परिहार होत आहे यास्तव माझा मनोरथ आहे कीं स्वामीचे चरण आश्रमास लागावे तेणेकरून माझे आणि माझी कन्या मदनमोहिनी पुरुषाचें मुखाव-लोकन करीत नाहीं तथापि तींहि स्वामीचे नांव ऐकून उत्कंठित जाहाली आहे तरी नगरांत यावे नंतर त्रिभुवनाधीश्वर बोलिला कीं आम्ही श्रीवाराणसीस जाणार आह्मास नगरांत यावयाचे प्रयोजन काय त्यात स्त्रीमुख पाहिले तर तिचे शासन करावे या पातकाचा परिहार करावा या गोष्टीवाचून आम्हास कारण काय त्यास तूं आम्हास नगरांत न्यावयाचा आग्रह न करावा उपरांत राजा अनंतसेन म्हणाला कीं स्त्रीचें मुखावलोकन न होय असा बंदोबस्त केला आहे याविषई कांहीं चिंता नाहीं याप्रमाणें बहुत आग्रह पाहून नगरांत राजगृहीं जाता जाहाला. तेथें शिष्याची चौकी ठेवून आपण स्नान संध्या देवतार्जन भोजन उरकून योगशास्त्राचें पुस्तक पाहात व्याघ्रांबरावर बसला. ते समई अनंतसेन याणे विज्ञापना केली कीं स्वामी आम्ही दर्शनेकरून पावन जाहालो परंतु कन्येचे चित्तांत आहे कीं पडदा टाकून स्वामीबरो-बर चार गोष्टी बोलाव्या तेणेंकरून नियमभंग न होता मनोरथ पूर्ण होईल आज्ञा जाहालीयास आणितो. नंतर तपस्वी म्हणाला कीं यास्तव मी नगरांत येत नवतो परंतु तुझे वचनें करून आलो आतां हे संकट आणिलेस असो तुझे छायेखालीं राहून

आज नैवेद्य वैश्वदेव केला त्या अर्थी तुझें वचन मोडीत नाहीं इतरांस तर भस्म केलें असते परंतु तिचे माझे दर्शन जाहाल्यास तुजला शाप देईन असा निश्चय करून पडदा टाकून मदनमोहिनीस आणिली उपरांत तिणें विचारिलें कीं स्त्रीचें मुखावलोकन करणार नाहीं हा नियम आपण घेतला आहे याचें कारण काय? तें ऐकावयाची इच्छा आहे. इतकें तिचें वचन आईकून त्रिभुवनाधीश्वर याणें उत्तर केलें कीं आम्ही तपस्वी आम्हास जन्मांतरीचे सकळ दोष दिसतात म्हणोन अनेक नियम घेऊन निंद्य पदार्थांचा त्याग करितो ही गोष्ट तुजला विचारावयाचें प्रयोजन काय! तेव्हां पुनः मदनमोहिनीने आग्रह पूर्वक विचारिलें कीं, दया मजवर करून ही गोष्ट मात्र सांगावी मग दुसरी विचारणार नाहीं. नंतर तपस्वी म्हणाला कीं तूं पुरुषाचें मुखावलोकन करणार नाहीं हा नियम घेतलास याचें कारण काय तें सांग त्यांतच माझें ही उत्तर होईल उपरांत राजकन्या भावार्थे करून बोलली कीं मी पूर्वजन्मी हरिणी होते तेथें एके समई आरण्यांत वणवा लागून वेढा पडला तेव्हा माझा पती कृष्णसार हरिण होता त्यास मी बोलिल्येजे आपली दोन बाळे आहेत यांतून एक तूंही व एक मी घेऊन बाहेर जाऊ ते समई त्याणें उत्तर केलें कीं, मी वाचलो तरी स्त्रीपुत्रादिक मिळतील देहे दुर्लभ आहे मी पोरास घेऊन जात नाहीं. असें बोलून आपण बाहेर गेला मी बाळकाचे ममतेस्तव वणव्यांत दग्ध जाहाल्ये हे आईकतांच त्रिभुवनाधीश्वर सक्रोध होऊन पडदा काढून बोलिलाकीं तूं राजकन्या म्हणून उपेक्षा केली नाहीं तरी भस्म केलें असतें. कारणकीं त्या समईं मी तुजला बोलिलो कीं एक पुत्र मी नेतो, एक पुत्र तूं न्यावा. तेव्हां तूं म्हणालीस कीं तुम्ही मात्र निघोन जावे. मी दोघा पुत्रास घेऊन येईन असें बोललीस यास्तव मी बाहेर निघालो तूं पुत्रास आणते समईं वणव्यांत पोरे पडोन मेलीं आणि तूं निघोन दुसरा कृष्णसार माझा शत्रु होता त्याजबरोबर गेलीस आणि मी मृत्य पावलो ते समईं स्त्रिया परम दुष्ट यांचा संग नसावा. असें स्मरण जाहालें तें आजपर्यंत अविच्छिन्न आहे. असें असतां तूं विपरीत बोलतेस. इतके बोलून तेथून निघावयाचे उद्योग आरंभिला. मग मदनमोहिनीने आपला पिता अनंतसेन यास सांगितलेकीं येथे यास राहावेजे. माझें लग्न करावें हा जन्मांतरीचा पती तेव्हांचा कलह आतां कशासाठीं करावा असें श्रवण करून अनंतसेन त्रिभुवनाधिश्वरास प्रार्थनापूर्वक बोलिलाकीं, महाराज आजपर्यंत कन्येने स्वयंवर केलें नाहीं त्या नियमाचें आज साफल्य जाहालें. आतां कन्येस पदरीं घ्यावे नाहींतर या उपरांत कन्या प्राण ठेवणार नाहीं. असा राजाचा व कन्येचा आग्रह आणि स्वकार्याची सिद्धि पाहून अनंतसेनास सांगितलें कीं तुम्हा उभयतांचा आग्रह या करितां व जन्मांतर संकेत प्रत्ययास आला म्हणोन मदनमोहिनीचा स्वीकार करितो. परंतु आमचे बहुत वर्षें विजयनगरीं वास्तव्य तरी इजला तेथें नेऊन विवाह करीन. इतकें आईकून अनंतसेन संतुष्ट होऊन आवश्य म्हणोन सरंजाम बरोबर देविला, आणि कन्येसहीत त्रिभुवनाधीश्वर याची रवानगी विजयवर्धननगरीं केली. उपरांत बहुश्रुत याणें तिजला आणून आपलें

घरीं ठेविली आणि तिला विचारिलें कीं तूं जन्मांतरी माझा आज्ञाभंग केलास त्याचें फल आजपर्यंत भोगिलेस आतां काय विचार आहे तो सांगणे तेव्हां मदनमोहिनी म्हणाली कीं माहाराज यानंतर जी आज्ञा होईल ती सिरसा मान्य आहे. शपथपूर्वक अनमान करणार नाहीं. असें तिचें वचन आईकून बोलिला कीं आम्ही रूपसेनाचे छाये खालीं सुख बहुत वर्षे पावलों यास्तव तूं या राजास वरावे तेव्हां माहासंकटे करून व स्वामी आज्ञा न उलंघावी म्हणोन मान्य करिती जाहाली उपरांत बहुश्रुत रूपसेन-राजा समीप जाऊन साष्टांगनमस्कार करिता जाहाला आणि विज्ञापना केलीकीं महा-राज स्वामीचें चरणप्रतापें मदनमोहिनी राजकन्या आणून घरीं ठेविली आहे सुमुहुर्त योजावा नंतर राजा रूपसेन श्रवणमात्रेंकरून संतोष पावोन बहुश्रुतास आलिंगन देता जाहाला उपरांत सुमुहुर्ते विवाह करून मदनमोहिनी स्वगृहास आणिता जाहाला आणि तिजबरोबर विषयसुख अनभऊं लागला. ही कथा शिवदत्ताचा पुत्र गुणसागर यास चातुर्यलतिकेनें सांगून म्हणाली कीं राजपुत्रा हा बहुश्रुतपणाचा प्रताप आहे यास्तव सर्व व्यसनें सोडून तूं विद्याभ्यास करावा तेणेकरून सकल राजे पादाक्रांत होऊन एकछत्र राज्य करिशील नाहीं तर पराभव पावसील हें आईकून गुणसागराने विद्याभ्यास करावयाचें मान्य केलें. या कथेचा सारांश

आर्या

नाना विद्या कोशल कला विचार प्रशस्त अर्जावे ।
शेवक योग्य बहुश्रुत साधुनि दुःसंग सर्व वर्जावे ॥१॥

---

# प्रि. राजवाडे यांचें निरुक्तांचें भाषांतर.

आम्हीं म. साहित्यपत्रिकेंत निरुक्ताचें भाषांतर छापून प्रसिद्ध करीत आहों हें सर्वांस विदित आहेच. पण तीन महिन्यांनीं प्रसिद्ध होणाऱ्या पत्रिकेंत दर अंकांत दोन फार्म छापलें तरी पूर्ण ग्रंथ पुरा करण्यास १२ वर्षेंहि पुरणार नाहींत. म्हणून— निरुक्ताला ३०० वर्गणीदार मिळाल्यास सर्व ग्रंथ एकदम छापावा असें योजलें आहे सर्व ग्रंथाची पत्रिकेच्या आकाराचीं सुमारें १२०० पानें होतील. छपाई वगैरेचा खर्च सुमारें ४३०० रु. येईल. तेव्हां निदान १२ रु. पुस्तकाची किंमत ठेवावी लागेल. प्रो. राजवड्यांसारख्या विद्वानाकडून भाषांतर होत आहे व त्याचा नमुनाहि लोकां-समोर आहेच. तेव्हां पुस्तकाविषयीं जास्त लिहिण्याचें कारणच नाहीं. निरुक्ताचें भाषांतर अद्यापि कोणत्याहि भाषेंत झालेलें नाहीं. म्हणून या ग्रंथाच्या योगानें मराठी वाङ्मयांत अपूर्व भर पडणार आहे. या करतां निरुक्ताला ग्राहक होऊ इच्छिणाऱ्यांनीं आपलीं नांवें व पत्ता शक्य तितक्या तातडीनें आमच्याकडे कळवावा. वर्गणी अगाऊ सध्यां आम्ही मागत नाहीं. हें ध्यानीं ठेवावें.

**कार्याध्यक्ष म. सा. पत्रिका**

४०३

## रा. द. रा. पिंगे (इंदूर) लिहितात

माझे एक एन्जिनिअर स्नेही 'घर कसें बांधावें' या विषयावर मराठींत एक पुस्तक लिहीत आहेत. सदरहु पुस्तकांत एन्जिनिअरिंगसंबंधींचे पुष्कळसे शब्द असे आहेत कीं त्यांस आज मराठींत समानार्थक (appropriate) प्रतिशब्द मिळत नाहींत. ही अडचण कशी दूर करावी या विचारांत ते आहेत. त्यांचे पुस्तकांत येणाऱ्या अशा शब्दांची एक यादी त्यांनीं मजकडे पाठविली आहे ती मी या पत्रासोबत आपणाकडे पाठवीत आहें. तरी आपण कृपा करून सोबत दिलेल्या यादींतील इंग्रजी शब्दांना समानार्थक असे मराठी प्रतिशब्द मजला होतां होईल तितके लवकर लिहून पाठविण्याची तसदी घ्याल अशी उमेद आहे.

1. Engineering, 2. Engineer, 3. Science of Building, 4. Building plot, 5. Plan, 6. Estimate, 7. Front Elevation, 8. Back Elevation, 9. Side Elevation, 10. Longitudinal Section, 11. Cross Section, 12. Compression, 13. Tension, 14. Shear, 15. Force, 16. Building Moment, 17. Horizontal, 18. Vertical, 19. Bearing power (of soil), 20. Eccentric loading, 21. Spirit level, 22. Level, 23. Ground level, 24. Levelling instrument, 25. Stress, 26. Strain 27. Elastic, 28. Neutral axis, 29. Symmetry, 30. Contract, 31. Contractor, 32. Departmental (work), 33. Setting out (foundation) 34. Pulley, 35. Pillar (Masonry or concrete), 36. Post (wooden), 37. Architecture, 38. Header stone, 39. Header & stretcher, 40. Intensity of pressure, 41. Centering, 42. Rubble, 43. Concrete, 44. Made soil, 45. Plinth, 46. Coping, 47. Champher, 48. Rounded edge, 49. Cornice, 50. Damp, 51. Bond, 52. Tail (of stone), 53. Brick-bats, 54. Brick-bat concrete. 55. Ashlar masonry, 56, Coursed rubble, 57. Uncoursed rubble, 58. Sill, 59. Lintel, 60. Ventilator, 61. Overlapping (of tail of stones), 62. Parliamentary hinges, 63. Segmental Arch, 64. Semi-circular, 65. Flat arch, 66 Relieving, 67. Inverted, 68. Wall shelf, 69. Open shelf, 70. Hall. 71. Sitting room, 72. Bed-room, 73. Bath-room, 74. Guest room, 75. Nursery room, 76, Open wall cupboard, 77. Receipe, 78. Prescription, 79. Reinforced concrete, 80. Glazed pipe, 81. Stair-case, 82. Strenger of stair-case, 83. Tread, 84 Step, 85. Riser, 86. Landing, 87. Winder, 88. Spiral, 89. Girder, 90. Joist, 91. Flange (of girder), 92. Web (of girder), 93. Floor, 94. Mosaic floor, 95. Glazed tiles, 96. Rough cast, 97. Plaster, 98. Gable, 99, False gable, 100. Truss, 101. Collar beam truss, 102. King post truss, 103. Queen post truss, 104. Collar beam,

105. Tie beam, 106. Verandah roof, 107. Coupled roof, 108. Hipped roof, 109. Terraced roof, 110. Pitch of roof, 111. Span, 112. Hip rafter, 113. Principal, 114. Parlin, 115. Ridge, 116. Valley, 117. Latrine 118. Cesspool, 119. Basket, 120. Corbel, 121. Syphon, 122. Flushing 123. Water closet, 124. Sewage, 125. Sullage, 126. Night soil, 127. Sewer, 128. Trap, 129. Sludge, 130. Septic tank, 131. Grit chamber, 132. Scum, 133. Dissolved, 134. Crystalline, 135. Solution, 136. Saturated, 137. Igneous (rock), 138. Agueous (rock). 139. Stratified (rock), 140. Unslaked lime, 141. Slaked lime, 142. Fat lime, 143. Hydraulic lime 144. Timber, 145. Seasoned, 146. Dry rot, 147. Wet rot, 148. Iron, 149. Annular rings, 150. Cast iron, 151, Wrought iron, 152. Rolled steel, 153. Steel, 154. Cast steel, 155. Case hardening, 156. Ore, 157. Voids, 158. Dense, 159. Density, 160. Form ( of concrete ) 161. Water proof, 162. Fire proof, 163. Impervious, 164. Shovel, 165. Tongued and grooved, 166, Scarf joint, 167. Compound wall, 168. Compound, 169. Abutment (of arch), 170. Shape (form), 171. Concentrated ( solution ), 172. Size (volume), 173. White lead ( carbonate of lead ), 174. Linseed oil, 175. Burnt umber, 176. Burnt senna, 177. Resin, 178. Meena, 179. Blue stone, 180. Gamboge, 181. Copal, 182. Vinegar, 183. Litharge, 184. Whiting, 185. Yield point ( of steel &. c.), 186. Additions, alterations, 187. Dismantling & repairing, 188. Installation (of septic tank).

**सूचना:**— शब्दाची परिभाषा ठरविताना खालील गोष्टी अवश्य लक्ष्यांत घेणें:—

(१) सामान्य लोकांस (मेस्त्री, गवंडी, अशिक्षित घरवाले वगैरे) सहज उच्चार करितां यावा म्हणून रोजच्या व्यावहारिक भाषेंत खपण्याजोगे शब्द अगदीं सोपे असावे. उदाहरणार्थ:— भुईसपाटी (व्यावहारिक); भूतल (शास्त्रीय); Elastic = लवचिक (व्यावहारिक); स्थितिस्थापक (शास्त्रीय); Vertical = ओळंब्यांत (व्यावहारिक); ऊर्ध्व ( शा० ); Flushing = पाणढोसळी ( व्या० ); जलोत्सर्जक (शा०) इत्यादि,

(२) शास्त्रीय शब्द वरच्याहून वेगळे असून गंभीर स्वरूपाचें असावे. व्यवहारांत यांचा नेहमीं उपयोग होईलच असें नाहीं. उदाहरणार्थ Stress = वैकारक; Strain प्रकृत; Force प्रेरक; Force (Per. sq inch) प्रेरण इत्यादि.

(३) जे इंग्रजी किंवा इतर परभाषेंतील शब्द मराठींत रूढ झाले आहेत ते विकृत स्वरूपांतसुद्धां तेथें वापरण्यास हरकत नाहीं. उदा० कांक्रीट किंवा कन्त्राट, शिमिट, कंत्राट, कंत्राटदार इत्यादि.

---

# १४ वें महाराष्ट्र साहित्य-संमेलन
## त्रोटक अहवाल

(लेखकः—ना. रा. सखदेव, बी. ए.)

वाङ्मयचर्चामंडळाच्या एका साप्ताहिक सभेंत साहित्यसंमेलनावर चर्चा चालू असतां साहित्यसंमेलनास बेळगांवीं आमंत्रण दिलें तर यशस्वी होईल कीं कसें असा प्रश्न निघाला पण मंडळाचे मर्यादित सभासद व उलट संमेलनाचें अत्यंत प्रयासाचें कार्य याचा विचार केल्यावरोबर मंडळास यशस्वितेची शंका वाटूं लागली, तरी न डगमगतां सर्व सभासदानीं हें कार्य अंगिकारण्याचें ठरविलें. हें कार्य तडीस लावण्यास प्रमुख नागरिकांच्या सहाय्याची अवश्यकता आहे हें जाणून मंडळानें गांवांतील महाराष्ट्रभाषाप्रेमी लोकांची एक सभा डॉ. के. वा. साठे यांचे घरीं ता. २५ मार्च सन १९२८ इसवी रोजीं बोलावली, व ती श्री. नगरकर वकील यांचे अध्यक्षतेखालीं भरली. या सभेंत ता. ७-४-१९२८ रोजीं ग्वाल्हेरला भरणाऱ्या संमेलनास आमंत्रण देण्याकरितां वाङ्मयचर्चामंडळाचा प्रतिनिधी पाठविण्याचें ठरुन त्याचे प्रवासखर्चाकरितां रुपये ७५ ( पंचाहत्तर ) मंजूर झाले.

महाराष्ट्र साहित्य संमेलन बेळगांवास बोलावण्याचें ठरलें हें प्रसिद्ध होतांच कर्नाटकांतील कांहीं लोकांचीं मनें अस्वस्थ झालीं व हें महाराष्ट्राचें कर्नाटकावर आक्रमण आहे असें त्याना वाटूं लागलें. हीच कानडी-मराठी वादाची सुरवात होय. कर्नाटकस्थांचा मुख्य आक्षेप असा कीं, या अधिवेशनानें कर्नाटक एकीकरणाच्या चळवळीस व्यत्यय येईल. या कल्पनेनें कांहीं कन्नडिगांनीं बेळगांवास हें अधिवेशन भरविणें अशक्य करण्याचा घाट घातला. ही विरोधकांची भीती निराधार आहे अशी खात्री असल्यामुळें कर्नाटकाचे पुढारी श्री. द. व्यं. बेळवी व श्री. गंगाधररावजी देशपांडे यांनीं संमेलनाचे कार्यास प्रारंभापासूनच पाठिंबा दिला. बेळगांवच्या वतीनें वाङ्मयचर्चामंडळाचे प्रतिनिधी श्री. वि. बा. मराठे यानीं दिलेले आमंत्रण विरोधकांच्या तारांना न जुमानतां ग्वाल्हेरच्या संमेलनानें स्वीकारलें. कानडी-मराठी वादाचा विषारी रोपा बागलकोट व धारवाड येथील कन्नडिगांनीं लावला व तो फोफावूं लागला; त्यामुळें बेळगांवच्या कानडी मराठी लोकांमधील आजपर्यंत सार्वजनिक कामांत वसत असलेला एकोपा व सलोखा या आगंतुक वादानें तुटतो कीं काय अशी भीती सर्वांसच वाटूं लागली. या वादाचा शेवट करण्याचे इरायानें ता. ३ जून १९२८ रोजीं श्री. द. व्यं बेळवी यांचे अध्यक्षतेखालीं क्रीडाभुवनाचे दिवाणखान्यात सभा भरविण्यांत आली व त्यांत "१९२९--सालामध्यें महाराष्ट्र साहित्यसंमेलनाची बैठक बेळगांवीं बोलावण्यांत आली आहे. ती बोलावणाऱ्यांचा उद्देश महाराष्ट्रभाषासंवर्धन हा असून भाषावार प्रान्त रचनेच्या प्रश्नाशीं त्याचा संबंध नाहीं व हें निमंत्रण सर्व बेळगांव जिल्ह्यातर्फे नसून मराठी भाषेविषयीं प्रेम बाळगणाऱ्या बेळगांव जिल्ह्यांतील लोकांतर्फेच आहे असें आज ही सभा स्पष्टपणें जाहीर करीत आहे." असा ठराव पास करण्यांत आला. याच सभेंत रीतसर स्वागतमंडळ बनेपर्यंत कार्य करण्याकरितां कार्यकारी कमेटी नेमण्यांत आली. या ठरावानें कानडी लोकांचें समाधान झालें नाहीं व विरोध तीव्रतर होऊं लागला. याच सुमारास कन्नडिगांनीं आपल्याहि चारपांच सभा बेळगांव येथें बोलावल्या व त्यांत महाराष्ट्र साहित्य-संमेलनास विरोध करण्याचे ठराव पास करण्यांत आले. महाराष्ट्र साहित्य संमेलनास जे लोक येतील त्यांना आपली नापसंती व विरोध दाखविण्याकरितां बोडके, अनवाणी येऊन काळ्या निशाणांचें प्रदर्शन करण्याचेंहि ठरलें होतें. पण बेळगांवांतील कांहीं जबाबदार पुढाऱ्यांनीं बेळगांव या विरोध प्रदर्श-

नांत सामील होणार नाहीं इतकेंच नव्हे तर पाहुण्यांचा अपमान केल्यास परिणाम चांगला होणार नाहीं असें जाहीर केल्यामुळें ही आग तितकीच दवली.

याच सुमारास श्री. गंगाधरराव यांनीं बेळगांव येथें भरलेल्या कर्नाटक एकीकरण सभेमध्यें या वादाविषयीं एक ठराव आणण्याचें योजिलें. हा ठराव कर्नाटकीयांचे दृष्टीनें अत्यंत इष्ट असाच होता. तो ठराव कांहीं गुंडांनीं सभेंत येऊं दिला नाहीं व श्री. गंगाधररावजींचा अपमान केला. हाच ठराव महाराष्ट्र साहित्यसंमेलनानें पास करावा असें श्री. बेळवी व श्री. गंगाधरराव यांना वाटत असल्यामुळें थोडा फरक करून श्री. न. चिं. केळकर यांनीं तोच ठराव विषयनियामक कमिटीपुढें मांडला त्याचा सारांश असा. बेळगांव कर्नाटकाचा प्रमुख भाग आहे. त्यांत कानडी ही बहुसंख्याकांची भाषा आहे व त्या दृष्टीनें बेळगांव जिल्ह्यांतील महाराष्ट्रीयांनीं कानडी भाषेस प्रमुख या नात्यानें मान द्यावा व उलट कर्नाटकीयांनीं मराठीस महत्वाची भाषा या नात्यानें मान द्यावा.

या ठरावापैकीं पहिलें कलम वाङ्मयपरिषदेच्या क्षेत्राबाहेर असल्यामुळें नियमबाह्य ठरविण्यांत आलें व बाकीचीं कलमें पास झालीं. यानंतर उभयपक्षांनीं पत्रकें काढून हा आगंतुक वाद मिटल्याचें जाहीर केलें.

या अकल्पित स्थानिक वादामुळें संमेलनाचा बराच वेळ घेतल्यामुळें पाहुण्यांचा कांहींसा विरस झाला व तसेंच संमेलनांतील कांहीं कार्यक्रम—निबंध वाचन, महत्वाच्या प्रश्नावरील चर्चा, विधायक योजनांचा विचार, परिचयविधी इत्यादि पार पडूं शकले नाहींत; पण त्याला नाइलाज होता. संमेलनांत जे ठराव पास झाले ते मागें प्रसिद्ध केलेच आहेत.

संमेलनाविषयीं लोकमत पाहूं गेले असतां तें यशस्वी झालें असेंच आहे. महत्त्वाच्या विषयावरील चर्चा राहून गेली हें खरें. पण रंगभूमीचा इतिहास लिहिण्याचा, राजवाडे संशोधन मंडळास मदत करण्याचा व पुस्तकावरील बंदी उठविण्याविषयींचा इत्यादि ठराव विधायक प्रत्यक्ष कामगिरी करण्याचे आहेत हें कोणीहि कबूल करील. याहिपेक्षां कर्नाटकांतील महाराष्ट्रीयांसंबंधीची कामगिरी विशेष भरीव आहे. या संमेलनामुळें आपल्या मातृभाषेची सेवा व अभिवृद्धीकरितां प्रामाणिक प्रयत्न करण्याचा हक्क सिद्ध झाला आहे.

बहुजन समाजाचे दृष्टीनें पोवाडे व काव्यगायन यांचे जाहीर कार्यक्रमाचीच कामगिरी अधिक भरीव ठरेल. या कार्यक्रमास जाणारा अलोट साक्षर व निरक्षर जनसमूह पाहून व समाजाची पोवाड्यांचें अनुकरण करण्याची उत्सुकता यावरून त्यामध्यें साहित्याविषयीं अभिरुची व आदर उत्पन्न झाला हीच ती कामगिरी होय.

याशिवाय अगदीं नवीन उपक्रम म्हणजे स्त्रियांकरितां आंखलेला स्वतंत्र कार्यक्रम होय. हा श्रीमंत मातोश्री जानकीबाईसाहेब कुरुंदवाडकर यांचे अध्यक्षतेखालीं झाला व मुख्य भाषण श्री. सौ. कमलाबाईसाहेब किबे यांचें झालें. स्त्रियांचेकरितां स्वतंत्र दिवस राखून ठेवून त्यांना बाल व स्त्री वाङ्मयावर विचार विनिमय करण्याची संधी दिली, हा बेळगांवचे संमेलनाचाच विशेष होय.

संमेलनास चोवीस निरनिराळ्या विषयांवर निबंध आले होते व महाराष्ट्रांतील व गोव्यांतील नाणावलेल्या कवींकडून शंभरापेक्षां अधिक कविता आल्या होत्या. त्यांपैकीं निवडलेले निबंध व कविता अहवालांत छापण्यांत येतीलच.

संमेलनांतील जमाखर्चाचा आढावा सोबत जोडला आहे. यावरून जमाखर्चाची कल्पना सर्वांना येईलच.

येणेंप्रमाणें संमेलनाचा त्रोटक अहवाल पत्रिकेच्या वाचकांना सादर करीत आहोंत.

## जमेचा आढावा

| रु. आ. पै. | |
|---|---|
| ५०४२--०--० | स्वागतमंडळ सभासद व देणगीदार मिळून |
| १२०३--०--० | प्रतिनिधी<br>रु. आ. पै.<br>१०३३--०--० नोंद झालेले ४९८<br>१७०--०--० ऐन वेळीं तिकिटें घेतल्यामुळें नांवें न नोंदलेले अजमासें ८०।८५<br>१२०३--०--० |
| ४६--०--० | देणगी प्रत्येकीं १ रु. देणारे ४६ |
| २९७-१२-० | भोजन तिकिटें विक्री करून आलेली रक्कम |
| ११५--८--० | स्त्रीप्रेक्षकांकरितां विकलेल्या तिकिटांची रक्कम |
| ५--३--० | चिटणीस सत्कारमंडळ यांना अनामत दिलेल्या दहा रुपयांपैकीं परत जमा |
| १५२--२--९ | शिल्लक मालाची विक्री करून आलेली रक्कम |
| १२--०--० | चिटणीस भोजनमंडळ यांचे मार्फत परत जमा |
| १०१--०--० | श्रीमंत जमखंडीकर यांची संमेलनकार्याकरितां देणगी |
| ६--१--३ | डि. सें. बँकेकडून व्याजाबद्दल आले. |
| ६९८०-११-० | एकूण जमा |

हा आढावा हिशेब तपासनीस, कार्यकारीमंडळ व स्वागत मंडळ यांच्या अखेरच्या सभेंत मंजूर झाला आहे.

## खर्चाचा आढावा.

| रु. आ. पै. | |
|---|---|
| १३४३--१--६ | कार्यकारीमंडळ<br>रु. आ. पै.<br>३४३--११--० प्रवास, प्रचार, मोटारभाडें पेट्रोल वगैरे.<br>३७१--१०--६ ऑफिस फर्नीचर, स्टेशनरी, पगार, घरभाडें, बॅजीस वगैरे<br>१०७--८--० टपाल<br>४५--६--० स्टेशनरी<br>४७४--१४--० छपाई<br>१३४३--१--६ |
| ३६४-१०-० | स्वयंसेवक मंडळ<br>रु. आ. पै.<br>३३२-१०-६ खादी कपडे<br>३२--०--० सायकलभाडें वगैरे<br>३६४-१० ६ |

| | |
|---|---|
| ३०१-१२-० | वसतिगृह मंडळ<br>रु. आ. पै.<br>८३--३--० कंदील<br>१२५--०--० दिवाभाडें वगैरे<br>३३--१--० वसतिगृहाची दुरुस्ती<br>५०--०--० किरकोळ वाहतुक, हमाली वगैरे<br>४--८--० पेंटर<br>६--०--० भंगी<br>३०१-१२-० |
| १०१-१३-९ | वैद्यक व चौकशी मंडळ<br>१०१-१३-९ वैद्यक मंडळाकडे खर्च—हमाली, गाडीभाडें, स्वयंसेवकांचा फराळ वर्तमानपत्रें वगैरे. |
| ५१--२--० | स्त्रीमंडळ<br>५१--२--० टपाल, स्वयंपाकी वगैरेचा पगार हारतुरे, गाडीभाडें वगैरे |
| २१६२--७--९ | |
| १५३४--७--० | भोजनमंडळ<br>१५३४--७--० (अ) मेजवानी खर्च, स्वयंसेवक व कार्यकारीमंडळ, भोजन खर्च.<br>१५३४--७--० |
| ४०७-१४-६ | सत्कारमंडळ<br>१९५--०--० (अ) पोवाडेगायनाचा खर्च पदकें, शाहिराचें रेलवेभाडें वगैरे<br>१६३--०--० फोटो व त्यावरील छपाई वगैरे<br>४९-१०-६ हारतुरे व स्टेशनावरील स्वागताचा खर्च<br>४०७-१४--६ |
| १४२--९--० | सभागृहमंडळ<br>१४२--९--० सभागृह, साफसफाई, आरास, फर्निचर, वाहतुक वगैरे.<br>१४२--९--० |
| १७-६--६ | जादाखर्च.<br>१० --४--६ चिटणीसांचा अधिवेशनानंतरचा टपाल-खर्च<br>७--२--० कार्यकारीमंडळाच्या बैटकीचा चिटणिसा-मार्फत खर्च<br>१७--६--६ |
| ४२६४-१२--९ | |
| १०००--०--० | रिपोर्ट छपाई<br>१०००--०--० रिपोर्ट छपाईबद्दल वाङ्मयचर्चामंडळास दिले. |
| १५०० --०--० | देणगी<br>१०५०--०--० वाङ्मयचर्चामंडळानें नियोजलेल्या |

| | | | |
|---|---|---|---|
| | रु. आ. पै. | | |
| | | ग्रंथसंग्रहास | |
| | ३००--०--० | बेळगांव येथील महिलाविद्यालयास ग्रंथरूपानें | |
| | १५०--०--० | येथील भगिनी वाचनालयास ग्रंथरूपानें | |
| | ४५०--०--० | | |
| ६७६४--१२--९ | एकूण खर्च | | |
| २१५--१४--३ | शिल्लक | | |
| | ५०--०--० | महाराष्ट्रसाहित्यपरिषदेस. | |
| | १६५--१४--३ | वाङ्मयचर्चामंडळाचें कार्याकरितां वा. च. मंडळास दिले. | |
| | २१५--१४--३ | | |
| ६९८०--११--० | | | |

सरकारनें जप्त केलेल्या मराठी पुस्तकांची यादी साहित्य पत्रिकेंत प्रसिद्ध करण्यासाठीं मागितली होती. त्याला उत्तर आलेलें खालीं दिलें आहे. सरकारनें जर ही यादी द्यावयाची नाहीं तर दुसरा कोण देणार ! कौंसिलमध्यें कोणी तरी प्रश्न विचारून ही माहिती मिळविली पाहिजे.

No. 2200-Poli.
Home Department (Political),
Bombay Castle, 4th, November, 1929.

From

C. F. Borges, Esquire,
Ag. Asst. Secretary to the Government of Bombay;

To

N. G. Chapekar, Esquire,
Chairman, Managing Committee,
Maharashtra Sahitya Parishad,
Budlapur.

Sir,

With reference to your letter dated the 3rd September 1929 to the Chief Secretary to the Government of Bombay, I am directed to state that Government regret that they are unable to comply with your request for the supply to your Society of a list of proscribed books in Marathi and of a copy of the Bombay Government Gazette.

I have the honour to be,
Sir,
Your most obedient servant,
(सही इंग्रजी)
Ag. Assistant Secretary to the Government of Bombay, Home Department (Political).

# १५ वें साहित्यसंमेलन.

यंदा गोमांतकांत भरणाऱ्या संमेलनाची तयारी जारीनें चालू आहे. स्वागत-मंडळाची स्थापना होऊन श्री. दत्तात्रय व्यंकटेश पै यांना मुख्य चिटणीस नेमण्यांत आलें आहे. प्रत्येक वाङ्मयसंस्थेनें व नियतकालिकानें आपआपलें नांव व संपूर्ण पत्ता कळविण्याबद्दल चालकांनीं विनंति केली आहे तिकडे सर्व संस्थांचें व नियत-कालिकांचें लक्ष जाईल अशी आशा आहे. स्वागत मंडळाचें नवीन प्रसिद्धिपत्रक खालीं दिलें आहे.

१३ व्या संमेलनापासून १५ व्या संमेलनापर्यंतचा म्हणजे माहे मे १९२८ ते एप्रिल १९३० ह्या दोन वर्षांत बृहन्महाराष्ट्रांत छोटीमोठीं जीं जीं म्हणून मराठी पुस्तकें प्रसिद्ध झालीं असतील त्या सर्वांचा संग्रह करून तो यंदां गोमंतकांत भर-णाऱ्या ह्या संमेलनप्रसंगीं उघडावा असें स्वागतमंडळानें ठरवलें असल्याचें प्रसिद्धिपत्रक क्र. २ वरून वाचकांस विदित झालेंच असेल. ग्रंथप्रदर्शनाची कल्पना अनेकांस अनेक वेळां जरी सुचली होती, तरी तिचा अधिकृत रीत्या उच्चार गेल्या बेळगांव संमेलना-च्यावेळीं कै. अण्णासाहेब परांजपे ह्यांनीं अध्यक्षस्थानावरून केला. आतां ते दिवंगत झाले. पण ह्या थोर वाङ्मयभक्ताची शेवटची इच्छा पुरवण्याची वाङ्मयोत्कर्षेच्छूंवरील जबाबदारी कमी न होतां उलट वाढलीच आहे, अशा समजुतीनें अत्यंत जोखमीचें व दगदगीचें असें हें नवें कार्य तडीस नेण्याचें धाडस स्वागतमंडळानें करूं घातलें आहे. त्यांतून त्याला यशस्वी रीतीनें पार पाडणें आणि संमेनाला एका अत्यंत आवश्यक अशा कार्याची जोड देणें हें ग्रन्थलेखक, ग्रन्थप्रसारक किंवा पुस्तकविक्रेते ह्यांच्याच हातीं मुख्यतः आहे.

आपल्या मराठी वाङ्मयांत विवक्षित कालमर्यादेंत किती पुस्तकें निपजलीं तें पुष्क-ळांस एकाच स्थळीं आणि एकाच वेळीं पाहतां यावें हा हेतु तर अशा ग्रंथसंग्रहाच्या कल्पनेच्या मुळाशीं आहेच. पण आपल्या वाङ्मयाची वृद्धि ठराविक काळांत कोणत्या अंगानें झाली ह्याचा साधार व तुलनात्मक अभ्यास अल्प वेळांत आणि विवक्षित पण एकाच ठिकाणीं जाऊन बसण्याचे श्रम घेऊन करण्याचें साधन निष्कांचन वाङ्मयोपा-सकांसही उपलब्ध व्हावें हाही हेतु अशा ग्रन्थसंग्रहाच्या कल्पनेच्या मुळाशीं आहे. आणि स्वागतमंडळानें केवळ एकाच वर्षांत प्रसिद्ध झालेल्या पुस्तकांचा तेवढा संग्रह न करतां तो दोन वर्षांत प्रसिद्ध झालेल्या पुस्तकांचा करण्याचें जें ठरवलें त्याचें कार-णही हेंच होय. आपल्या पुस्तकांची प्रत्यक्ष जाहिरात आणि तीही नेमकी ज्यांच्यामध्यें त्याला गिऱ्हाईक मिळणें शक्य आहे, त्या वाचकवर्गांत होईल, हाही एक, ग्रंथकारांच्या दृष्टीनें, अशा प्रदर्शनापासून फायदा होऊं शकेल.

ह्या ग्रंथसंग्रहाचा मालक कोण व प्रदर्शनानंतर त्याची व्यवस्था काय राहील, असा प्रश्न पुष्कळांच्या मनांत येणें साहजिक आहे. पण त्याचें निश्चित उत्तर देणें स्वागतमंडळाला शक्य नसल्यानें तें काम त्यानें संमेलनावरच सोंपवण्याचें योजिलें आहे. पुढचें संमेलन ज्या ठिकाणीं भरेल त्या ठिकाणीं फक्त एकाच वर्षांत प्रसिद्ध

झालेल्या पुस्तकांचा संग्रह केला गेला आणि तेथें मागील वर्षाचा संग्रह नेण्यांत आला तर तेथेंही दोन वर्षांत निपजलेलीं पुस्तकें एकत्र सांपडण्याची सोय होऊन तुलनात्मक अभ्यास करण्यास बरें पडेल. ह्या दृष्टीनेंही यंदांच्या प्रदर्शनांतील ग्रंथसंग्रहाची व्यवस्था लावतां येण्यासारखी आहे. पण संमेलनानें किंवा ग्रंथ पाठवणाऱ्यांनीं सामुदायिक रीत्या ग्रंथसंग्रहासंबंधीं कांहींच निश्चित न केलें तर ज्यानें जो ग्रंथ पाठवला असेल तो त्याच्या स्वाधीन करण्याचें वचन स्वागतमंडळ देत आहे. ग्रंथ पाठवणारा गृहस्थ संमेलनास येऊं शकला तर प्रदर्शन संपतांच तो त्याच्या हातीं समक्ष देण्यांत येईल. नाहींपेक्षां टपालांतून त्याच्याकडे सुरक्षित पोंचतां केला जाईल किंवा तो सुचवील ती अन्य व्यवस्था करण्यांत येईल.

ग्रंथांप्रमाणेंच बृहन्महाराष्ट्रांत आजमितीस चालत असलेलीं एकंदर नियतकालिकें व हस्तलिखित मासिकें ह्यांचेंही प्रदर्शन भरवावें असा विचारही स्वागतमंडळानें केला आहे. नियतकालिकांपैकीं दैनिकें, अर्धसाप्ताहिकें, साप्ताहिकें व पाक्षिकें म्हणजे पत्ररूपी नियतकालिकें, ह्यांचें प्रत्येकीं निदान पांचपांच अंक आणि मासिकें, द्वैमासिकें, त्रैमासिकें वगैरे म्हणजे पुस्तकरूपी नियतकालिकें, त्याचप्रमाणें हस्तलिखित मासिकें ह्यांचे प्रत्येकीं दोनदोन अंक ( खास अंक नव्हतें. ते पुस्तकांत गणले जातील.) व्यवस्थित व सर्वांच्या नजरेंत भरतील अशा रीतीनें ठेवण्यांत येतील. पैकीं पत्ररूपी नियतकालिककर्त्यांनीं त्याच्या ज्या अंकांत संमेलनाचीं प्रसिद्धिपत्रकें छापलीं जातील ते अंक पाठवले म्हणजे झालें. पुस्तकरूपी नियतकालिककर्त्यांस संमेलनाचीं एकंदर पत्रकें सविस्तर छापणें शक्य नसलें तर त्यांनीं संमेलनासंबंधींच्या पत्रकांचा गोषवारा काढून आपल्या अंकांत छापावा व त्यांपैकीं दोन अंक पाठवावे, अशी स्वागतमंडळाची विनंति आहे. तरी ग्रंथकार आणि नियतकालिककार ह्यांनीं ग्रंथ व नियतकालिकें खालील पत्त्यावर पाठवून स्वागतमंडळास आभारांत ठेवावें.

दत्तात्रय व्यंकटेश पै.
मुख्य चिटणीस, १५ वें म. सा. सं.
मडगांव-गोवा.

* *

## विनंति.

सर्व वाङ्मयसंस्थांनीं आपाआपले पत्ते आम्हांस कळविले असतां आम्ही पत्रिकेंत प्रसिद्ध करूं. त्यामुळें प्रत्येक संस्थेला सर्व वाङ्मयमंडळाचे वृत्तांत मिळूं शकतील. तरी पत्ते कळविण्यास कोणी चुकूं नये अशी विनंति आहे,

संपादक म. साहित्यपत्रिका

* * *

रा. सा. मंडलीकांच्या चरित्राच्या परीक्षणांतील एक दोन विधानें निराधार आहेत अशाविषयीं रा. हवालदार यांचें पत्र आलें आहे. त्या संबंधाचा विचार स्थलाभावीं पुढील अंकापर्यंत टाकणें भाग आहे.





सालाची वर्गणी रा. न. र. फाटक यांजकडे दिली; परंतु माझ्याकडे वर्गणी आली नाहीं असें रा. फाटक म्हणतात. तरी असा वर्गणीदारांच्या खातीं जमाखर्च करून घ्यावा.

४ विषय— प्रचारकांविषयीं.

ठराव=जो कोणी योग्य व लायक मनुष्य परिषदेचा प्रचारक म्हणून काम करण्यास तयार होईल त्यास वसूल केलेल्या रकमेंतून जास्तींत जास्त शेंकडा दहा रु. खर्चादाखल द्यावे.

(१७-१२-२९)

हजर—१ ना. गो. चापेकर. २ प्रो. मा. दा. आळतेकर; ३ सुं. भा. वैद्य; ४ के. ल. ओगले; ५ न. र. फाटक.

ठराव=१ हिंदुस्थानाबाहेरील देशांकरतां साहित्यपत्रिकेची वर्गणी ट. ख. सुद्धां पांच रुपये ठरावी.

२ वाचनालयें, वाङ्मयमंडळें वगैरे संस्थांकडून पत्रिकेचे वर्गणीदार समजून वर्गणी घ्यावी.

३ तहाहयात सभासदांची वर्गणी तूर्त चालू खर्चाकरतां घ्यावी.

४ वाङ्मय-सेवा-मंडळ, मुंबई, यांची आजपर्यंतची देणें झालेली रक्कम देण्यांत यावी.

५ रा. जांभेकर यांस दिलेल्या पुस्तकास बक्षीस मिळाल्यास त्यावर परिषद हक्क सांगणार नाहीं.

६ बेळगांव-संमेलनाकडून नियमाप्रमाणें बरीच रक्कम यावयाची असतां फक्त ५० रु. च आले. या कामीं नियमांचें उल्लंघन करण्यांत सम्मेलनाची चूक झाली आहे. पण पुढें वाद न करतां आलेली रक्कम स्वीकारण्यांत यावी.

## मुंबई आफिसचा जमाखर्च
### आक्टोबर १९२९

| जमा | | खर्च | |
|---|---|---|---|
| ३–८–० | वर्गणी ता. ४ ए. पी. भाट यांजकडून १९२९ सालाची | ०–१–० | टपाल खर्च ता. २ |
| | | ०–०–६ | टपाल खर्च ता. ३ |
| ७–०–० | वर्गणी दत्ताराम गणपत दळवी यांजकडून १९२८।२९ ची ता. २१ | ०–०–६ | टपाल खर्च ता. ६ |
| | | ०–९–६ | टपाल कार्यकारी मंडळीच्या सभेची पत्रें ता. ११ |
| ३–०–० | वर्गणी ता. २३ रामराव पुरुषोत्तम जोशी १९२९ ची | ०–०–६ | टपाल ता. १३ |
| | | १–९–० | अंक ३ वर्ष २ चें रेल्वेभाडें, हमाली वगैरे ता. १६ |
| १४–८–० | | ०–०–६ | टपालखर्च ता. १८ |
| | | २–५–६ | |

## नवंबर १९२९

| | | | |
|---|---|---|---|
| ३–८–० | वर्गणी ता. ८ श्रीपाद महादेव वर्धे यांजकडून वर्गणी १९२९ ब. | २–८–० | प्रवासखर्च ता. ४ रोजीं कारकून याचा खर्च कार्याध्यक्ष याजकडे कोल्हापुरास जाऊन येण्यास |
| ३–८–० | वर्गणी विठ्ठलराव शिवलिंग याजकडून वर्गणी १९२९ बा. ता. १२ | ०–१–० | टपाल खर्च ता. ८ |
| ३–८–० | वर्गणी ता २० शंकर सायण्णा परशा १९२९ बा | ०–०–६ | टपाल खर्च ता. ९ |
| | | ०–०–६ | टपाल खर्च ता. १५ |
| ३–८–० | वर्गणी प्रोफेसर गोविंद सदाशिव दंडवते १९२९ बा ता. २६ | ०–१–० | टपाल खर्च ता. १८ |
| | | ०–०–६ | टपाल खर्च ता. २० |
| १४–०–० | | ०–१२ | सभासदांचें रजिस्टर सर्वे बुक आणलें त्यास |
| | | ३–७–६ | |

## डिसेंबर १९२९.

| | | | |
|---|---|---|---|
| ३–८–० | वर्गणी ता. ३ आत्माराम हणमंत बोरवणकर १९२९ बा | ०–०–६ | टपाल खर्च ता. २ |
| | | ०–१०–० | टपाल खर्च कार्यकारी [illegible]ची पत्रें ता. ११ |
| ३–८–० | वर्गणी ता. ६ हणमंत नारायण नाईक सन १९२९ सालाबा | ०–१–० | टपाल खर्च ता. १९ |
| ७–०–० | | ४०–०–० | एस्टॅब्लिशमेंट खर्च कारकुनाचा सप्टेंबर ते डिसेंबर १९२९ चार महिन्याचा |
| | | ४०–११–६ | |

**( ना. गो. चापेकर यांच्या मार्फत झालेला. )**

| जमा | | खर्च |
|---|---|---|
| आक्टोबर ४६–४–० वर्गणी वसूली | | ३१–८–६ टपालखर्च |
| नोव्हेंबर ११९–८–० | | १–९–६ |
| यांत ४० रु. विलें पारलें शाखासभेकडून आलेले आहेत | | |
| डिजेंबर ९६–८–० | | २–१२–० |
| २६२–४–० एकूण | | ३५–१४ |

पुणें येथें आर्यसंस्कृति मुद्रणालय, निमणबाग, टिळकरोड, येथें वासुदेव गोपाळ परांजपे यांनीं छापिलें व मुंबई येथें महाराष्ट्र-साहित्य-परिषदेच्या कार्यालयांत (माई जीवनजीची गल्ली, मुंबई नं. २) परिषदेकरितां रा. ना. गो. चापेकर यांनीं प्रसिद्ध केलें.







